आध्यात्मिक साहित्य प्रकाशन, क्रमांक १६ व १७.

महानुभाव कवि डिंभ मुनि कृष्णदास

विरचित

# आत्मतीर्थ-प्रकाश

आणि

## स्ववृद्धाचारप्रबंध

(स्ववंशवर्णन)




संपादक व प्रकाशक

कृष्णदास महानुभाव

मूल्य एक रुपया पंचवीस नवे पैसे

# अनुक्रमणिका





ग्रंथ प्राप्ति-स्थान :

१. श्रीगीता-आश्रम
तिलक रोड, हैदराबाद–१ (आंध्र प्रदेश)

२. श्री. श्रीनिवासराव मदनूरकर (ॲडव्होकेट)
रिसाला अब्दुल्ला, हैदराबाद (आंध्र प्रदेश)

३. प. श्री. पंथबाबा महानुभाव
नाका नं. ३, वार्ड नं. ७
श्रीरामपूर जि. अहमदनगर (महाराष्ट्र)

४. ई. श्री. आवेराजदादा महानुभाव दर्यापूरकर
श्रीकृष्णाश्रम, राजापेठ, अमरावती

## सस्नेहादर समर्पण

**आत्मतीर्थ श्रीदत्तमंदिर**

जीर्णोद्धारकार्याकरिता तन, मन आणि धनाने झटणाऱ्या
त्यागमूर्ति श्री. ओंकारदादा महानुभाव यांच्यासह
सर्व संत, महन्त व सद्भक्त मंडळींस
हा काव्यग्रंथ सस्नेहादर समर्पण

कृष्णदास

आत्मतीर्थ-प्रकाश व ऋक्मिणी-स्वयंवर ग्रंथाकरिता
प्रारंभी मिळालेले

# द्रव्य सहाय्य

| | |
|---|---|
| २००.०० | प. म. श्री. पंथबुवा महानुभाव |
| ८६३.०० | ई. श्री. ऋषिराजदादा महानुभाव ऊर्फ श्री. श्रीनिवासराव मदनूरकर (ॲडव्होकेट) |
| ७००.०० | श्री. प्रेमदासजी आर्किटेक्ट (हैदराबाद) |
| ८००.०० | श्री. गोपाल गंगाधर सेठी |
| ५२०.०० | मुंबईची सेठ मंडळी |
| ३०८३.०० | |

ह्या सर्व निस्वार्थ व विद्याप्रेमी सहाय्यकांचा मी अंतः-करणपूर्वक आभारी आहे व ह्यांचेकडून सदैव असेच ज्ञान-प्रचारार्थ सहाय्य होत रहावे अशी प्रभूचरणी नम्र प्रार्थना आहे.

—कृष्णदास

---

विशेष सूचना :—ह्यापैकी एक रुपया देखील मला दान म्हणून मिळालेला नाहीं तर काहीं रुपये ग्रंथविक्रीनंतर परत करावयाचे असून काहींच्या मोबदल्यात ग्रंथ द्यावयाचे आहेत.

—कृष्णदास

# पुरस्कार

महंत श्री. कृष्णदास महानुभाव यांनीं संपादित केलेल्या कृष्णदास विरचित आत्मतीर्थ-प्रकाश आणि स्ववृद्धाचारप्रबन्ध या ग्रंथांचें प्रकाशन, आत्मतीर्थ श्रीदत्तमंदिराच्या उद्‌घाटनप्रसंगीं होत आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. आध्यात्मिक सा. प्रकाशनाचीं हीं दोन पुष्पें आहेत.

प्राचीन मराठी वाङमयाच्या अभ्यासकाला महानुभावीय वाङमयाचा अभ्यास करणें अत्यंत आवश्यक आहे. गद्यवाङमयाच्या बाबतींत तर महानुभावीय वाङमयाखेरीज दुसरें वाङमय उपलब्धच नाहीं. दुसरी महत्त्वाची गोष्ट ही कीं हें सर्व वाङमय सांकेतिक लीपीच्या कडीकुलुपांत बंद केल्यामुळें तत्कालीन भाषेचें मूळ स्वरूप कायम राहीलें आहे. ज्ञानेश्वरी अथवा विवेकसिंधूसारख्या ग्रंथाच्या बाबतींत सुद्धां आपणांस असें म्हणतां येणार नाहीं. त्यामुळें भाषाशास्त्राच्या व भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीनें महानुभाव वाङमयाचें एक आगळेंच स्थान आहे.

संकुचित पंथीय दृष्टीकोन बाजूला सारून महानुभाव संतमहंत सर्व मराठी वाचकांसाठीं प्राचीन मराठी ग्रंथ प्रसिद्ध करीत आहेत ही घटना अत्यंत स्वागतार्ह आहे. आज असे असंख्य ग्रंथ महानुभाव मठां-मंदिरांत आहेत. त्यांची बृहत्सूची तयार करून या सर्व ग्रंथांचा मराठी जनतेला परिचय करून देण्याचें व त्यांचें यथाकाळ प्रकाशन करण्याचें महत्त्वाचें कार्य महानुभाव परिषदेसारख्या संस्थेनें हातीं घेणें अगत्याचें आहे. हें एकटया व्यक्तीचे, मग ती व्यक्ति कितीहि कार्यक्षम असली तरी, तिचें काम नव्हें.

महंत श्री. कृष्णदास महानुभाव यांनी वैयक्तिक झीज सोसून आजवर अनेक ग्रंथांचें प्रकाशन केलें आहे ही अत्यंत कौतुकास्पद व उत्तेजनार्ह गोष्ट आहे.

'आत्मतीर्थ-प्रकाश' आणि त्याबरोबरच प्रकाशित होणारा 'स्ववृद्धाचारप्रबंध' हे दोन्ही ग्रंथ कृष्णदास कविनें लिहिले असून या कवीच्या आजपर्यंत उपलब्ध असलेल्या प्रकाशित व अप्रकाशित ग्रंथांची यादी प्रस्तुत ग्रंथाच्या प्रस्तावनेंत आलेली आहे. तीवरुन कवीच्या काव्यकर्तृत्वाचा विस्तार दिसून येतो.

कवि कृष्णदास स्वतःला विनयानें कविडिंभ म्हणवून घेत असला तरी तो एक व्युत्पन्न पंडित कवि होता असें दिसून येते. त्याची भाषा परिष्कृत असून तिच्यांत भरपूर आवेश आहे. श्लोकबद्ध रचनेंत त्याला अनेक बंधनें पाळावीं लागत असल्यामुळें अशा ग्रंथांत रसवत्ता कमी प्रमाणांत आढळून येते पण ओंवोबद्ध ग्रंथांत त्याची रचना अतिशय रसाळ झाली आहे. लक्ष्मणास्वयंवरांत त्यानें खूप विस्तार केला आहे आणि अनेक विषय हाताळले आहेत, पण असें असूनहि कांहीं प्रसंग मुक्तेश्वरादि पंडितकवींची आठवण करून देण्याइतपत सरस उतरले आहेत. अशा या कवीचे सर्वच्या सर्व ग्रंथ प्रकाशित होणे आवश्यक आहे.

आत्मतीर्थ-प्रकाश व स्ववृद्धाचारप्रबंध या ग्रंथांच्या प्रकाशनानें त्याचे केवळ पांच ग्रंथ प्रसिद्ध होत आहेत. बाकीचेहि लौकरच प्रकाशित होतील अशी आशा आहे.

महंत श्री. कृष्णदास महानुभाव यांनीं या ग्रंथास विवेचक व उपयुक्त प्रस्तावना लिहिली असून तिच्या योगानें अभ्यासकांचा बराच लाभ होणार आहे. त्यांच्या हातून अशीच वाङ्मयसेवा भरपूर प्रमाणांत होवो व त्यांना सर्वांचें यथाशक्य सहाय्य लाभो हीच ईशचरणीं प्रार्थना आहे.

रा. ब. माळेकर
मराठी विभाग प्रमुख
उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद.

दि. १९-२-६४

# प्रस्तावना

जगांत असा एकहि मनुष्य जन्माला आला नाहीं कि ज्यानें आयुष्यांत कधी एकदाहि गायन केले नसेल, अथवा तो गायनश्रवणाने मुग्ध झाला नसेल. मनुष्यच नव्हे तर पशुपक्षी देखील सुस्वर गायनाने मोहित होत असल्याचे आपण अनुभवितो. सभाषण मनोभाव व्यक्त करते व उत्कृष्ट संभाषण परिणामकारक ठरते पण त्यालाच जर सुस्वर गायनाची साथ लाभली तर ते भावनांना असे आलोडित करते कि त्यामुळे अंतर्मनावर त्याचे अत्यंत सखोल परिणाम होतात. उत्कृष्ट सभाषण व उत्कृष्ट गायन या दोहोंच्या तुलनेत जनमनावर प्रभावी परिणाम करण्याच्या दृष्टीने उत्कृष्ट गायनालाच प्रथम स्थान द्यावे लागेल. म्हणूनच कि काय प्राचीन साहित्यकारांनी गूढ अशा आध्यात्मशास्त्रापासून घेऊन गणितशास्त्रासारखे रूक्ष विषय देखील पद्यांतूनच वर्णिले असावेत.

महानुभाव साहित्यांत पद्यग्रंथांप्रमाणे गद्यग्रंथांना पण प्रारंभापासूनच महत्वाचे स्थान प्राप्त झाले आहे (महानुभाव पथाचे हे एक वैशिष्ठ्य लक्षांत घेण्यासारखे आहे.) महानुभाव साहित्य ज्या एका मूळ ग्रंथावर आधारले आहे तो माहिम्भटांनी संग्रहित केलेला श्रीचक्रधर स्वामींचा लीळाचरित्र हा पहिला ब्रहद्ग्रंथ माहिम्भटांनी गद्यांतच लिहिला व तेव्हांपासून आजपर्यंत बरेचसे महत्वपूर्ण गद्यग्रंथ महानुभाव साहित्यांत लिहिल्या गेले असले तरी एकूण पद्यग्रंथांना पाहून ते (संख्येपेक्षां गुणानें) तोकडंच भरतील आणि महानुभावीय साहित्यकारांना गद्यग्रंथ लिहिण्यापेक्षां पद्यग्रंथ लिहिणेच अधिक प्रिय असल्याचे प्रत्ययास येईल, त्याचे कारण पद्य जनमनाची अधिक पकड घेते हेच असावे; ही परिस्थिती ओळखूनच आजपासून तीनशे चार वर्षांपूर्वी—

भीष्माचार्यें म्हणितले मुनी कृष्णदासा :
महाराष्ट्र प्रबंधीं तुझी वाणी सुरसा ॥
तरी आत्मतीर्थ महात्म्य प्रकाशा :
ग्रंथना तूं करी ॥१५॥

सिद्धयामळ ग्रंथ नाम :
तेथ सैंहाद्रिखंडे आत्मतीर्थ महात्म्य ॥
तेयां संस्कृताचे महाराष्ट्र उत्तम :
करावें तुआं ॥१६॥

—अशी श्री. भीष्माचार्यांनी इच्छा प्रदर्शित केली असावी; त्याबरोबर संस्कृतचे मराठी रूपांतर होऊन सर्वसाधारण जनतेस समजण्यास सोपे जावे हा हेतु पण आचार्यांचा असणारच. तेव्हां —

तेयां भीष्माचार्याचेंनि निर्देशें :
श्रीगुरु मयंकाचेंनि ज्ञान-प्रकाशें ॥
श्रीदत्तात्रेय वर्णावेयां हरुषें :
स्फारली मती ॥१७॥

—असा हा आत्मतीर्थ-प्रकाश-प्रबंध गुरुजनांच्या आशीर्वादयुक्त निर्देशनाने लिहिण्यांत येणार असला तरी तो कसा आणि कोण-कोणत्या साहित्य व काव्यगुणांनी युक्त असावा, याबद्दल कृष्णदास कवि स्वतःलाच संबोधून लिहितात —

साहित्यालंकारविलासें :
कवी तें काव्य करिती विशेषें ॥
परि तें उपमा चोरटी तैसें
न करी कवित्व ॥१८॥

साहित्यमार्गु जीर्ण होआवा :
परि उक्तीविलासु नूतन योजावा ॥

तैंचि ग्रंथु मिरवे सुहावा :
पंडितांमाजी ॥१९॥

कव्हणी ग्रंथीं साहित्यालंकारू असे :
परि पातां सिद्धांतु न गवसे ॥
येरीं ठाईं सिद्धांतु असे :
तरि नसेचि साहित्यालंकारु ॥२०॥

तैसां न हो आत्मतीर्थ-प्रकाशु :
जेथ दिसे साहित्य सिद्धांतरसु ॥
कांजे सिद्धांत-शिरोमणी श्रीदत्तेशु :
अेथ कथानायकु ॥२१॥

केवळ ज्यांत साहित्यालंकाराचाच विलास असेल ते कवीचे काव्य निरुपयोगी असल्यामुळें तू करूं नकोस. साहित्याचा मार्ग जीर्ण म्हणजे रुळलेला-आध्यात्मिक सिद्धांतयुक्त-असावा. पण वाणीचा विलास तेव्हढा नवीन योजावा तेव्हांच तो ग्रंथ विद्वज्जनांत मान्यता पावेल. कोण्या ग्रंथांत साहित्यालंकार आहेत पण सिद्धांत धुंडून हि सांपडत नाहीं. तर कुण्या ग्रथांत सिद्धांत आहे पण साहित्यालंकार नाहीं. त्याप्रमाणे आत्मतीर्थ-प्रकाश हा ग्रंथ नसावा तर त्यांत साहित्यसिद्धांत आणि काव्यरस या दोहोंचा सुंदर मिलाप साधला पाहिजे, कारण सिद्धांताचे शिरोमणी स्वतः श्रीदत्तात्रेयप्रभू या ग्रंथाचे कथानायक आहेत.

महानुभावीय तत्त्वज्ञानानुसार प्राणिमात्रांचा पूर्णपरब्रह्म हाच परमसिद्धांत व त्याची प्राप्ति करून घेणे म्हणजेच परमपुरुषार्थ साधणे होय. त्यामुळे महानुभावीय संपूर्ण वाङ्मय त्या एका परमसिद्धांता-भोंवती म्हणजे परमेश्वराभोंवती विस्तारलेले दिसून येते. स्थान, प्रसाद, भिक्षुक आणि वासनिक हें परमेश्वरप्राप्तीचे चार साधन श्रीचक्रधरस्वामीने निरूपिले आहेत. या चतुर्विध साधनांपैकी सर्वज्ञांनी

स्थानाला सर्वप्रथम स्थान दिले असल्यामुळे स्थानाचे महत्व विशेष-जाणून अनेक महानुभाव कवींनी स्थानांचे माहात्म्य वर्णन करणारे भक्तिरसपरिपूर्ण काव्य रचिले आहे. त्यांमध्ये ऋद्धिपुर-वर्णन व सह्याद्रि-वर्णन हे दोन ग्रंथ महानुभावीय काव्य वाङ्मयांतील साती ग्रंथांपैकी असून विशेष प्रसिद्धीस पावले असले तरी पंचाळेश्वर-महात्म्य, प्रतिष्ठान-महात्म्य, आत्मतीर्थ-महात्म्य वाकी-माहात्म्यासारखे तीर्थ-स्थान व ग्रामांचे वर्णन करणारें काव्य पण सिद्धांत व साहित्यालंकारयुक्त असल्यामुळें साहित्यिक व पारमार्थिक दृष्टीने अभ्यसनीय असल्याचे मला दिसले; म्हणून त्यापैकी कवि डिंभ कृष्णदास मुनि विरचित 'आत्मतीर्थ-प्रकाश' नामक हा काव्यग्रंथ, आत्मतीर्थ-श्रीदत्तमंदिर-उद्‌घाटन-समारंभ प्रसंगी रसिक वाचकांस सादर करीत आहे.

**ग्रंथ संपादन**

कै. प. पू. श्री. दत्तलक्षराज महंत महानुभाव यांनी लिहिलेली आत्मतीर्थ-प्रकाश या काव्यग्रंथाची एक प्रति कै पं श्री. बाळकृष्ण शास्त्री महानुभाव यांनी मला संपादनाकरिता आणून दिली होती. अधिक कांहीं प्रति मिळविण्याकारिता तेव्हां आम्हीं दोघांनी प्रयत्न पण केले होते. ते असफल ठरल्यामूळे तेव्हांपासून आजपर्यंत हे काम तसेच पडून होते. श्री पंचाळेश्वर-आत्मतीर्थ-दत्तमंदिर-उद्‌घाटन दि. २५-२-६४ रोजी होणार असल्याची निमंत्रण पत्रिका दि. २८-१-६४ रोजी मला मिळाली. या शुभप्रसंगी आत्मतीर्थ-प्रकाशग्रंथ प्रसिद्ध झाल्यास विशेष चांगले होईल असे वाटले. कै. महंत श्री. दत्तलक्षराज महानुभाव यांची सर्वांगीण विद्वत्ता, प्राचीन मराठी वांङमयाचे संशोधन व महानुभाव तत्वज्ञानाचे सखोल अध्ययन लक्षांत घेता त्यांनी लिहिलेली एकुलती एक प्रतीच ग्राह्य मानून प्रेसकॉपि तयार केली व प्रेसमध्ये पाठविली. सोळा पाने छापून झाली व मुंबई येथून महत्वाचे आमंत्रण आले. मुंबईस ता. ३-२-६४ रोजी नवे नवनीतकार श्री. ज. शा. देशपांडे यांच्या

भेटीचा सुयोग घडून आला. त्यांनी आत्मतीर्थ-प्रकाशग्रंथाची एक प्रतिलिपी (या ग्रंथांत मी या प्रतीचा देशपांडेप्रत म्हणून सर्वत्र उल्लेख केलेला आहे.) मला दिली. सदहुं प्रतिलिपी नाशिक जिल्ह्यांतील शिंदे येथील श्री. भीमराजदादा बीडकर यांनी एका पोथीवरून केलेल्या नकलेची नक्कल असल्यामुळें विशेष प्रमाणभूत मानता येत नसली तरी अन्य प्रतींच्या अभावी तिचाच मी पाठभेदाकरिता उपयोग करण्याचे ठरवून दि. ११-२-६४ ला हैदराबादेस परतलो. तेव्हां ३२ पृष्ठ प्रेस-मधून छापून आल्याचे दिसले. तिकडे उद्घाटन समारंभ जवळ आला असल्यामुळे ही छापलेली पाने रद्द करून पुनः प्रारंभापासून पाठभेदा-सह छापणे अशक्य व असामयिक वाटले. शेवटी सध्या एकाच प्रतीवरून हा ग्रंथ छापून पूर्ण करावा लागत असला तरी उद्घाटन समारंभानंतर याच ग्रंथाला पाठभेद व शब्दकोश वगैरे जोडण्याचा माझा मानस असल्यामुळे ज्यांच्याजवळ या ग्रंथाची पोथी असेल त्यांनी ती पाठ-विल्यास त्यांचे जाहीर आभार तर मानण्यांत येतीलच शिवाय योग्य मोबदला पण देण्यांत येईल.

कै. श्री. महंत महानुभावांनी अर्धफुलस्केप साईजच्या १२ इंच लांब व पावणे आठ इंच रूंद अशा अत्यंत साधारण व पातळ कागदावर काळ्या शाईने सुवाच्य अक्षरांत ही प्रतिलिपी केली आहे ज्या पोथी-वरून ही नक्कल केली आहे. त्या पोथीची कोणत्याहि प्रकारची कांहींच माहिती त्यांत लिहिलेली नाहीं. लिहितांना काहीं चिन्हें व अनुस्वार पण दिले आहेत जे प्राचीन हस्तलिखितांत कुठेच आढळत नसल्यामुळें ही सुधारणा पू. श्री. महंत महानुभावांचीच समजली पाहिजे. पहिल्या पानावर १३ ओव्या लिहिल्या असून पुढील बहुतेक सर्व पानावर प्रत्येकी साडे चौदा ओव्या लिहिलेल्या आहेत. अल्पावधींतच कागद अत्यंत जीर्ण झाला असून घडी करताच त्याचे दोन तुकडे पडतात. शेवटी ग्रंथ-प्रकाशकाला त्यांनी विनंतीवजा जी सूचना केली आहे. तीवरून या

विद्वान व थोर महंताचे आत्यंतिक वाङ्मय प्रेम व वाङ्मय-प्रकाशनाची आंतरिक कळकळ प्रत्ययास येते. सदहु सूचना जशीच्या तशीच येथे देत आहे.

## विनंती

या आत्मतीर्थ-प्रकाश ग्रंथाची एकच प्रत असल्यामुळें या प्रतीमध्यें चुका राहण्यांचा संभव आहे. तरी छापण्याच्या उद्यमशीलांनी आणीक प्रति मिळवून यांत कांहीं न्यूनता असल्यास संपूर्णता करून यास छापावे; यांच्या मूळ प्रति थोडयाच आढळतांत तरी विद्याप्रेमी जनांनी या महात्म्यास अवश्य छापवून तीर्थाची महत्वी जगांस प्रसिद्ध करण्यांची अवश्य तसदी घ्यावी अशी नम्र विनंती आहे

मु. सं. श्री देवदेवेश्वर म दत्त. क. महानुभाव. ता. ८-५-२३ ई.

**ग्रंथाचे नांव**

कै. प. पू. महंत श्री. गोपीराजबाबा महानुभाव यांनी कवि डिंभ मुनि कृष्णदास कवीच्या काव्यग्रंथांची एक यादी प्रा. रा. ब. माढेकर यांना लिहून पाठविली. तींत या ग्रंथाचे नांव 'आत्मतीर्थ प्रकाश म्हणजे आत्मतीर्थ महात्म्य' असें लिहिले आहे. देशपांडेप्रतींत देखील प्रारंभी 'पंचाळेश्वर-आत्मतीर्थ-महात्म्य' असे ग्रथाचे नांव लिहिले असून प्रसंग-समाप्ति लेखांत सुद्धां 'सैहाद्रि खंडे आत्मतीर्थ महात्म्ये' असे लिहिल्याचे दिसते. या ग्रंथाच्या १५ व्या ओवींत 'तरी आत्मतीर्थ महात्म्य प्रकाशां : ग्रंथना तूं करी' असा उल्लेख भीष्माचार्यांच्या मुखातून स्वतः कवीनें वदविला आहे. तसेच १६व्या ओवींत 'सिद्धयामळ' ग्रंथांतील सैंहाद्रखंडांत मूळ कथा 'आत्मतीर्थ महात्म्य' या नावाने असल्याचा उल्लेख आढळतो. या कथेला ६२२ व्या ओवींत 'आत्मतीर्थ आख्यान' पण म्हटले असले तरी—

म्हणे कवि-डिंभु मुनी कृष्णदासु । ययां ग्रंथा नांव आत्मतीर्थ प्रकाशु
आइकितां श्रोतेयां उपजे उल्लासु : श्रीदत्तस्मरणाचा । ६९३॥

या ओवींत स्वत: कविनेच या ग्रंथाचे नांव आत्मतीर्थ-प्रकाश असल्याचे स्पष्ट म्हटले आहे व मूळ प्रतिलिपीच्या प्रारंभी देखील 'श्री आत्मतीर्थ-प्रकाश ग्रंथ प्रारंभ: ।। प्रसंग १२ ओव्या ६९५' (अंतिम संस्कृत श्लोकासह) असे लिहिले असल्यामुळें आम्ही या काव्यग्रंथाला 'आत्मतीर्थ-प्रकाश' हेच नांव दिले आहे.

**ग्रंथाचा लेखनकाल व लेखनस्थल**

मूळ प्रतिलिपींत ग्रंथलेखनकाल कुठेच आलेला नाहीं पण देशपांडे-प्रतींत मात्र लेखनकाल व स्थलाचा उल्लेख असलेल्या दोन ओव्या आढळल्या ज्या मी मूळ संहितेंत शेवटीं (६९५ व ६९६) दिलेल्या आहेत. कारण याच दोन ओव्या थोडया फरकाने कै. श्री. गोपीराज महंत महानुभाव यांच्या जवळील पोथींतून महंतजींच्याच हस्ताक्षराने लिहिलेल्या हैदराबाद येथील साहित्यिक प्रा. रा. ब. माढेकर यांचे जवळ मला पहावयास मिळाल्या. साहित्यक्षेत्रांत पू. महंतजींचा थोर अधिकार लक्षांत घेता मी ह्या स्थानकाळ निर्णायक दोन्ही ओव्या प्रमाण मानल्या आहेत; शिवाय ह्या ओव्या पिल्ले यांच्या जंत्रीशी तपासून पाहिल्या असता शक, संवत्सराचे नांव, महीना व तिथी हे सर्व बरोबर असल्याचे आढळून आले पण शुक्रवाराऐवजी त्या दिवशी गुरुवार येतो. हा वाराचा फरक तिथीच्या आरंभावर व शेवटावर अवलंबून असल्यामुळें ही तीथी प्रमाण मानण्यास कांहींच हरकत वाटत नाहीं.

शके पंधरा शते एक्यांसी । विकारी संवत्सर जेष्टमासी
शुक्रवासर आष्टमीसी । कृष्णपक्षी ।।६९५।।

ग्राम नेउर खटा दंडेश्रु । तेथ वैराटोपनाम मुनी कृष्णदासु
तयाचेचि करण आत्मतीर्थ-प्रकाशु । संपला तत्हस्ताक्षरें ।।६९६।।

ह्याच दोन ओव्या कै. महंत श्री गोपीराज बुवा महानुभाव यांच्या पोथींतून त्यांनी अशा लिहिल्या आहेत—

शके १५ पंधरा शते एक्यांसी । विकारी संवत्सर जेष्टमासी
शुक्रवार अष्टमीसी । कृष्णपक्षी ।।
ग्राम नेऊरखेडा उदेश्र् । विराटदेशोपनाम कृष्णदासु
त्याचे करण "आत्मतीर्थ प्रकाश्" । संपला हस्ताक्षरे ।।

ह्या ओव्यांवरून या ग्रंथाचा लेखनकाल जेष्ट वद्य-अष्टमी शुक्रवार शके १५८१ विकारी नाम संवत्सर, तारीख ३ जून १६५९ ईसवी असल्याचे स्पष्ट होते व लेखन स्थळ श्री. महंतजीनी लिहिलेल्या ओव्यांवरून 'ग्राम नेऊरखेडा उदेश्रु' व देशपांडे प्रतीवरून 'ग्राम नेउर खटा दंडेश्रु' असल्याचे दिसते. देशपांडे प्रतींत कदाचित खेडाचे खटा व उदेश्रुचे दंडेश्रु लेखनदोषामुळें झाले असावे असे वाटत असले तरी मूळ पोथी पाहिल्याशिवाय निश्चित विधान करता येत नाहीं.

**ग्रंथलेखकाचे नांव व चरित्र**

या काव्यग्रथांत कवि खाली ओव्यांत दिल्याप्रमाणें आपल्या नांवाचा उल्लेख करतो—

| | | |
|---|---|---|
| १. संतां विणवी कवि-डिंभ कृष्णदासु : | ओवी क्र. | १३ |
| २. भीष्माचार्यें म्हणितलें मुनी कृष्णदासा : | ,, | १५ |
| ३. म्हणे मुनि कृष्णया कवि-डिंभू : | ,, | ३७ |
| ४. म्हणे कृष्णया कवि–डिंभु : | ,, | ८८ |
| ५. मुनि कृष्णया म्हणें संत श्रोतीं : | ,, | १८७ |
| ६. पुढां काइं वर्तलें तें कृष्णमुनी : सांघैलु कवि–डिंभु | ,, | ३५२ |
| ७. संतां विणवी कवि-डिंभु कृष्णमुनी : | ,, | ४५५ |
| ८. म्हणे कवि-डिंभु मुनी कृष्णदासा : | ,, | ६९३ |
| ९. तेथ वैराटोपनाम मुनी कृष्णदासु : | ,, | ६९६ |

ह्या सर्व उल्लेखांवरून कवीचे मूळ नांव कृष्णदास असून काव्य-वर्णनाच्या ओघांत जिथे जसे बसविता येईल तिथे तसे तो निरनिराळ्या प्रकाराने बसवितो. बहुतेक सध्या महानुभाव पंथांत 'दास' अंति असलेले नांव प्रचारांत असल्याचे दिसत नसले तरी पूर्वी हे नांव प्रचलित होते असे या कवीच्या कृष्णदास नांवावरून निर्विवाद सिद्ध होते. याच कवीच्या लक्ष्मणा-स्वयंवर काव्यांत कवीचे नांव कृष्णदास आले आहे.

साधनामृत स्तोत्राच्या अंतिम श्लोकांत सुद्धा कवीने स्वतःचे नांव कृष्णदासच लिहिलें आहे—

इतिकृत कवि-डिंभे मच्छ देशोपसंज्ञे ।
स्तवन विरम शब्दें कृष्णदासे अजाणे ।।
शशि वर गुरुदाने स्तोत्र हे सुन्दराचे ।
पठति मुनि सदा जे दोष जाती तयाचे ।।

कृष्णदास नांवाविषयी महाराष्ट्र सारस्वतकार देखील लिहितात—

"कृष्णदास या नांवाचे मराठींत इतके कवि होऊन गेले आहेत कीं त्या सर्वांचा नीट पत्ता लाऊन काल वगैरे ठरविणे फार अवघड झालें आहे. महानुभाव मंडळीत तर कृष्णदास हें नांव पुष्कळांनींच धारण केलेलें आढळते; आणि या पंथांतील मंडळींचीहि रचना मराठींतच असल्यामुळें घोटाळ्याला तें एक आणखी कारण होते. उदाहरणार्थ, कृष्णदास या नांवाच्या एका महानुभाव कवीची कृष्णलीलांच्या वर्णनाची कवणें आहेत. या पण कृष्णदासाच्या कालासंबंधें किंवा चरित्रासंबंधें कोणतीच माहिती उपलब्ध नाहीं..."

(म. सा. आवृत्ति ५ वी, पृ. ६२३)

नेहमी कवीच्या नांवाच्या मागे अथवा पुढे येणाऱ्या डिंभ या शब्दाचा अर्थ बालक असल्यामुळे नम्रतादर्शक कवीने हे टोपण नांव धारण केले असावे असे वाटते. प्रस्तुत कवीच्या पूर्वी देखील १४ व्या

शतकांतील 'अन्वयस्थळकार' कृष्णमुनि सुद्धां स्वतःला कवि-डिंभ म्हणवून घेत असल्याचा दाखला मिळतो.

कवीचे कृष्णदास मुनि अथवा कवि-डिंभ कृष्णदास हे नांव जसे कविच्याच काव्यावरून निश्चित होते तसे त्याच्या श्रीगुरुचे नांव मयंकराज असल्याचे देखील कवीच्याच काव्यांत स्पष्ट सांगितले आहे—

मज भवसागरीं बुडतां । दमयंतीयां काढौनि शीघ्रतां
परमार्गीं निरोविलें महंतां । श्रीमयंकासीं ।।१०।।

तेयां भीष्माचार्यांचेनि निर्देशें । श्रीगुरु मयंकाचेनि ज्ञान-प्रकाशें
श्रीदत्तात्रेय वर्णावेयां हरुषें । स्फारली मती ।।१७।।

श्रीगुरु मयंकाचेनि ज्ञानोपदेशें । वरी भीष्माचार्यांचेनि प्रबंधनिर्देशें
श्रीदत्तार्चन केलें या ग्रंथमिषे : वर्णन क्षुधार्थीचे ।। ६९२

या आत्मतीर्थ-प्रकाश ग्रंथांत कवीचे उपनाम वैराट अथवा वायदेशकर असल्याचा कुठेच उल्लेख आलेला नाहीं पण श्री. गोपीराज महताजवळील पोथींत असलेल्या व देशपांडे प्रतीतून आम्ही या ग्रंथाच्या शेवटी घेतलेल्या दोन ओव्यांपैकी एका ओवीत 'ग्राम नेडर खटा दंडेश्रु । तेथ वैराटोपनाम मुनी कृष्णदासु' असा उल्लेख आलेला आहे. शिवाय स्वकृत रूक्मिणी स्वयंवरांत देखील प्रस्तुत कवि कृष्णदास लिहितो—

वैराटे कृष्ण-डिंभे विरचित कुशळें खंड पैं हें नवावें ।।
वैराटोप-समाभिख्यो मुनिवर : कृष्ण : स्वयंचाकरोत् ।।

ह्या सर्व विवेचनावरून कवीचे नांव कृष्णदास त्याच्या श्रीगुरूचे नांव मयंकराज व उपनाम वैराट उर्फ वायदेशकर असल्याचे निश्चित होते. वायदेशकर ही वेली उपाध्यायाम्नायांतील असल्यामुळे ते उपाध्याम्नायांतील असल्याचे ओघानेच आले. या बाबतींत अधिक एक प्रमाण ग्रंथसमाप्ति लेखाचे पण घेता येईल ज्यावरून हीं विधानें अधिक स्पष्ट होतील—

इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराट देशोपनामालंकृत मयंकराजशीष्य कृष्णमुनिना विरचिते .........

पुष्कळ प्रयत्न करून देखील ह्याशिवाय अधिक या कवीची चरित्रविषयक माहिती काहीच सांपडत नाहीं त्याचे एक कारण, परम पूजनीय श्री. नागदेवाचार्यांच्या चरित्राचे संकलन स्मृतिमध्ये आले. नंतर वृध्दाचाररूपाने काही वर्षें तरी तत्कालीन महात्म्यांची त्रोटक चरित्रे येत राहिली पण नंतर ही सांखळी केव्हां कुठे तरी तुटली. त्यामुळे त्यानंतरच्या ग्रथलेखकांबद्दल माहिती सांपडणे अत्यंत दुर्मिळ झाले आहे. दुसरे कारण, महानुभाव पंथांत ईश्वरपूजेशिवाय व्यक्तिपूजेला विशेष स्थान नसल्यामुळें त्याच्या मृत्यूनंतर कुणाची समाधी, फाटो अथवा चित्रें पूजण्याची किंवा चरित्रें वाखाणण्याची प्रथा नसल्यामुळे. देखील पूर्वपुरुषांची चरित्रविषयक माहिती मिळू शकत नाहीं. सुदैवाने कवि कृष्णदास यांनी स्ववृद्धाचार प्रबंध लिहून स्वतःच्या वंशवृक्षाचे काव्य लिपीबद्ध करून ठेवले आहे. त्यांत त्यांनी भगवान श्रीचक्रधरस्वामी व श्रीनागदेवाचार्यापासून घेऊन तो स्वतःपर्यंत सर्वपूर्वजांची नांवें दिलीं आहेत. हा प्रबंध आम्हाला प्रा. रा. ब. माढेकर यांच्या संग्रही मिळाला व तो कै. महंत श्री. गोपीराजबाबांच्या लेखणीने लिहिलेला असल्यामुळे आम्ही तो या ग्रंथाच्या शेवटी इत्थंभूत दिला आहे.

## ग्रंथलेखकाचा इतर ग्रंथसंभार

कै. प. पू. महंत श्री. गोपीराज बाबा महानुभाव यांनी प्रा. रा. ब. माढकर यांचेकडे पाठविलेल्या यादींत या कवीच्या चोवीस काव्यग्रंथांची नांवें दिलीं असून 'इत्यादि काव्य उपलब्ध आहेत आणि संग्रहांत सर्व पोथ्या आहेत' असे कळविले आहे. येथे ती यादी देत आहे—

**प्रकाशित ग्रंथ**

१. रुक्मिणी-स्वयंवर

या काव्याचे नवखंड असून श्लोक संख्या ७२० आहे. ह्याचे दुसरे नांव 'कल्पद्रुम' असे असून हा ग्रंथ प्रा. रा. ब. माढेकर यांनी 'प्रतिष्ठान' मासिकातून क्रमशः प्रसिद्ध केला आहे व स्वतंत्र पुस्तकरूपाने पण उपलब्ध आहे.

२. लक्ष्मणा-स्वयंवर

हे काव्य ३१३० ओव्यांचे असून त्यांत एकूण २७ प्रसंग आहेत. या काव्याचे संपादन 'पंचधारा' या त्रैमासिकांतून प्रा. रा. ब. माढेकर यांनी केले असून स्वतंत्र पुस्तकरूपाने देखील तो छापल्या जात आहे.

३. आत्मतीर्थ-प्रकाश (हे काव्य आपण वाचीत अहात)

४. स्ववृद्धाचारप्रबंध (स्ववंश वर्णन)

(हे काव्य ह्याच आत्मतीर्थ-प्रकाश ग्रंथाच्या शेवटी आपणास वाचावयास मिळेल

५. ऋद्धिपुर महात्म्य अध्याय १० ओव्या ६९९

हा ग्रंथ देखील छापलेला असून त्याचा परिचय श्री वि. अ. कानोले यांनी मराठवाडा विद्यापीठपत्रिकेंत करून दिला आहे व त्याची ओवीसंख्या ७९७ दिली आहे.

**अप्रकाशित ग्रंथ**

| | | |
|---|---|---|
| १. पंचाळेश्वर-महात्म्य | अध्याय १२ | ओव्या ६७७ |
| २. फलटण (फलस्थपूर)-महात्म्य | ,, १३ | ,, १००५ |
| ३. वाकी-महात्म्य | ,, ५ | |
| ४. डोमेग्रामवर्णन. | | |
| ५. साधनामृत-स्तोत्र | | श्लोक ८३ |
| ६. साधन-जीवनामृत-स्तोत्र | | श्लोक १५७ |

७. वणीता-प्रमाद-स्तोत्र
८. तीर्थमालिका श्लोक ४८
९. चेंडूफळी श्लोक २०३
१०. श्रीकृष्णजयंति अध्याय ३ ओ. २०७
११. आत्मपुराण
१२. मृगपाशविमोचन
१३. सख्यासंवाद
१४. भुर्ड, 'भरड' (भरड नांवाचे काव्य)
१५. छिन्नपापवर्णन-अभंग (वोटा, गूढा, छिन्नस्थळी वर्णन)
१६. आरत्यांचा दशक
(भुवन सुंदराची, बेलापूर, वाकेश्वरार्ति व एकांक वर्णनार्ति)
१७. पंचावतार-स्तोत्रें
१८. पंचधावे
१९. प्रसाद-विरह-स्तोत्र
२०. विवेक-विलास

महंतजींना माहीत असलेल्या ग्रंथांचीच नांवे त्यांनी या यादींत दिली असणार याशिवाय अद्याप अनुपलब्ध असलेले प्रस्तुत कवीचे काव्यग्रंथ पण पुढे मागे सांपडण्याचा संभव असला तरी, आहे तेवढ्या ग्रंथनिर्मितीनेच ह्या कवीचे नांव साहित्यक्षेत्रांत अजर व अमर करून ठेवले आहे. कवि कृष्णदासाच्या संपूर्ण काव्याचें पुढे मागे प्रकाशन झाल्यास मराठी काव्यगंगेंत हा भक्तिरसयुक्त नवरसपरिपूर्ण निर्मल काव्यस्रोत येऊन मिसळल्यामुळें तिच्या आधीच समृद्ध असलेल्या प्रवाहास अधिक समृद्धता येईल तरी काव्यरसिकांनी व भक्तजनांनी या महान कार्याकडे अवश्य लक्ष असू द्यावे.

### समारोप

आत्मतीर्थ-प्रकाश ग्रंथाचे काव्यरसग्रहण व इतर महानुभाव-कवींच्या काव्याशी तुलनात्मक विवेचन करण्याची माझी इच्छा जोपर्यंत

जुन्या दोनचार प्रति उपलब्ध होत नाहींत तोपर्यंत आवरून धरणेच योग्य होईल. तेव्हांच पाठभेद व शब्दकोश पण या ग्रंथाशी जोडण्याचा माझा विचार असल्यामुळें सध्या प्रस्तुत काव्यग्रंथाची ही मूळसंहिताच या सांक्षिप्त प्रस्तावनेसह मराठी काव्यरसिकांस, अभ्यासकांस आणि श्रद्धापरायण भक्तजनांस सादर करीत आहे.

**ऋणनिर्देश व आभार**

पूर्वाश्रमीचे श्रीनिवासराव मदनूरकर व आता संन्यासाश्रमी झालेले श्री. ऋषिराज दादा महानुभाव (याच ग्रंथांत त्यांचा चित्ररूपाने देखील परिचय दिला आहे.) यांचेच प्रथमतः आभार मानावे लागतील कारण त्यांनी जर आत्मतीर्थ-प्रकाश व रूक्मिणी-स्वयंवर या दोन्ही ग्रंथां-करिता लागणारा कागद विकत घेण्यास प्रारंभी द्रव्यसहाय्य केले नसते तर हा ग्रंथ छापणे मला अत्यंत कठिण झाले असते. (प्रारंभी दिलेली सहाय्यकांची यादी पहावी) प्रा. रा. ब. माढेकर यांनी त्यांच्याजवळ असलेली कवि कृष्णदासाची व त्याच्या काव्याचा माहिती पुरविली, व अल्पावधींत पुरस्कार लिहून दिला; आणि नवे नवनीतकार श्री. ज. शा. देशपांडे यांनी आत्मतीर्थ-प्रकाशग्रंथाची दूसरी प्रतिलिपी देऊन सर्वप्रकारे साहनुभूति दर्शविली याबद्दल ह्या दोन्ही साहित्यिकांचा मी सदैव ऋणी राहीन. तसेच 'हिंदु विजय' साप्ताहिकाचे संपादक व कृपा मुद्रणालयाचे संचालक श्री. यशवंतराव जोशी यांनी स्वतःच सर्व प्रुफें तपासून अल्पावधींत मूळ संहितेची ८० पानें छापून दिली आणि कमर्शियल प्रिंटिंग प्रेसचे व्यवस्थापक श्री. मुनिन्द्र जी व श्री. केदार जी यांनी बाकीची सर्व छपाई अगदी वेळेवर करून दिली या बद्दल मी या सर्वांचा अंतःकरणपूर्वक आभारी आहे.

दि. १८-२-१९६४ कृष्णदास महानुभाव

॥ श्रीचक्रधर: शरणम् ॥

# आत्मतीर्थ-प्रकाश

---

१

## मंगलाचरण

**श्रीपरमात्मने नमः**

सैंह्याद्रिशिखरे रम्यमनसूयात्रिनन्दनम्
तं वन्दे परमानन्दं दत्तात्रेयं जगद्‌गुरुम् ॥

ॐ नमो सच्चिदानंदघना । अलक्षा दीव्यतेजा नीरंजना
विश्वव्यापका स्वानन्दरमणा । कृपावंता जी ॥ १

मोहांध:कारीं ऋषिगणीं । उदैला परब्रह्म दिनमणी
तो नमिला शंकरा वरप्रदानीं । श्री दत्तात्रेयो ॥ २

पुरवावेयां भक्तां प्रेम-तवनीं । पूर्वतेजें अवतरला कैवल्यधरणीं
तो अभिवंदिला लीलां भवमोचनीं । श्रीकृष्णराओ ॥ ३

जीवां घडवावेयां प्रेमाधिकारू । जो श्वेतर्कि अवतरला उदारू
तो मिआं वंदिला विद्यासागरू । श्रीचक्रपाणी ॥ ४

तोडोनि जीवांचा अविद्याबंधु । परकैवल्यीं बैसवीं शुद्धु
तो नमस्करिला कृपासिंधु । श्रीप्रभू तूर्यधामु ॥ ५

जो निरंतरू जीवांलागी स्नेहाळु । चहूंदानीं करी आनंदा सुकाळु
तो साष्टांगी अभिवंदिला कृपाळु । श्रीचक्रधरू ॥ ६

जीव रोगिअे उपचारावेयां संसारीं ।
चक्रेश्वरे निर्माण केला धन्वन्तरी
तेयां नागार्जुनाचा पदकल्हरीं । नमन माझे ॥ ७

चुकऔनि भवशत्रुची चोरवाट । जेणें कैवल्य राजपथ दाविला प्रकट
तेयां श्रीगुरूचा पदीं लल्लाट । ठेविलें मियां ॥ ८

भांडऔनि अन्यधर्मु कांचमणीं । जेणें दाविली परज्ञान रत्नखाणीं
तो श्रीगुरू आठवीं स्मरणीं । बैसितां वेळी ॥ ९

मज भव-सागरीं बुडतां । दमयंतियां काढौनि शीघ्रतां
परमार्गीं निरोविलें महंतां । श्रीमयंकासी ॥ १०

तणें मज ब्रह्मविद्योपदेशु केला । म्हणौनि परमार्गीं सग्तां जाला
प्रबंध रचनें हर्ष उपनला । शांतिरसी ॥ ११

मज नाहीं पूर्ण सिद्धांतु विवेकज्ञानु ।
केवि करवि शांतिरसां अवतरणु
परि दैवमार्ग प्रसंनतेयां ओढवीणु । आत्मतीर्थ-प्रकाश ग्रंथी ॥ १२

संतां विणवी कवि-डिंभ कृष्णदासु ।
मियां ग्रंथ रचनें धरिला हव्यासु
भीष्माचार्यें केला सदोपदेशु । पवित्र कथेचा ॥ १३

हा पहिला प्रसंगु परिकरू । एथें केलें मंगलाचरण सुंदरू
ययां नांव कथा शिरू । जाणिजे पैं ॥ १४

*इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराटदेशोपनामालंकृत-*
**मयंकराजशिष्यकृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ-प्रकाश**
**ग्रंथे मंगलाचरणो नाम प्रथमः प्रसंगः ॥१॥**

# २

## कथामुख

श्रीपरमात्मने नमः

भीष्माचार्यें म्हणितलें मुनी कृष्णदासा ।
महाराष्ट्र प्रबधी तुझी वाणी सुरसा
तरी आत्मतीर्थ महात्म्य प्रकाशा । ग्रंथ ना तू करी ॥ १५

सिद्धयामळ ग्रंथनाम । तेथ सैंहाद्रिखंडे आत्मतीर्थ महात्म्य
तेयां संस्कृताचे महाराष्ट्र उत्तम । करावें तुआं ॥ १६

तेयां भीष्माचार्याचेंनि निर्देशें । श्रीगुरु मयंकाचेनि ज्ञान-प्रकाशें
श्री दत्तात्रेय वर्णवियां हरुषें । स्फारली मती ॥ १७

साहित्यालंकारविलासें । कवी तें काव्य करिती विशेषें
परि तें उपमा चोरटी तैसें । न करी कवित्व ॥ १८

साहित्यमार्गु जीर्ण होआवा । परि उक्ती विलासु नूतनु योजावा
तैचि ग्रंथु मिरवे सुहावा । पंडितांमाजी ॥ १९

कव्हणीं ग्रंथीं साहित्यालंकारू असे । परि पातां सिद्धांतु न गवसे
येरीं ठाईं सिद्धांतु असे । तरिं नसेचि साहित्यालंकारू ॥ २०

तैसा न हो आत्मतीर्थ–प्रकाशु । जेथ दिसे साहित्य सिद्धांतरसु
कां जे सिद्धांत-शिरोमणी श्री दत्तेशु । अेथ कथानायकु २१

जो अत्री अनुसूयेचा कुमरू । अविनाश मूर्ति जयाची सुंदरू
तो चहुंयोगीं क्रीडे निरंतरू । नाना वेषीं ॥ २२

तो श्रीदत्तात्रेय अमोघ दर्शनीं । क्रीडा करी जिए स्थानी
तिअें महातीर्थें बोलिजेति सुरगणीं । महेशादिकीं ॥ २३

महेशें गौतमा न्यायशास्त्र निर्धारे ।
द्वियार्ध सहस्रसूत्रें निरोपिली विस्तारे
तेथ श्रीदत्ताधिष्टितें तीर्थें प्रवरे । बोलिलीं ती सूत्रीं ।। २४
श्रीदत्ताधिष्टीत मातापुर । आत्मतीर्थ आणि पांचाळेश्वर
इत्यादिकीं अनुवर्ते निरंतर । अधिष्टान भगवंताचें ।। २५
म्हणौनि भगवंते चरणांकिते । तिअें बोलिजेति महातीर्थें
जियें अन्यदेवतां अधिष्ठितें । तिएं सामान्ये जाणावी ।। २६
देवतां पूजने सकाम प्राप्ति । परि तेणें असे पुनरावृत्ती
परमेश्वर पूजनें मोक्षप्राप्ती । चुके यातायात ।। २७
तें प्रकट भागवतीं बोलिलें । नवां ही रुषीमाजी दर्शविलें
जनकाप्रति मिश्रावतारूं निरोपिलें । परमेश्वर देवतांचें ।। २८
पुनरपि करभाजनांप्रती । प्रश्न करी जनक चक्रवर्ती
चहुंयोगीं परमेश्वर ध्यानमूर्ती । ओळखिजे कैसी ।। २९
कवणें नामें कैसें वर्ण । कवणें विधानें कीजे पूजन
तें मजप्रति करावें निरोपण । ऋषीराजोत्तमा ।। ३०
मग करभाजनें देवतां तिरस्कारें । चहुंयोगीचें चान्हीं निर्धारें
परमेश्वरावतारूं निरोपिलें सादरे । वर्णनामु विधिक्रमें ।। ३१
ते चाऱ्हीं दत्तात्रे पाळा बोलिजे । यांतेचि पंचकृष्ण ऐसें म्हणिजें
हें गर्गोक्त कल्पीं जाणिजे । मूळसे एकादशीं ।। ३२
कल्पादि कृति धर्म-मूर्तिचें कुमर । नारायण ऋषी प्रवर
नर आणि प्रशांत हे पांच ही अवतार । ईश्वराचे ।। ३३
तेयां पांचा अवतारांचा श्रीचरणीं । महातीर्थें जन्मली जनी
तें वंदिजेति सुर-गणीं । आदि करौनियां ।। ३४
तेयां माजी विख्यातु त्रिभुवनीं । जे आत्मतीर्थोद्भवलें श्रीदत्तचरणीं
तेयांचे आख्यान पुसें निमिषारण्यीं । असितु देवलासी ।। ३५

तेआं दोहीं ऋषींचा संवादु । ग्रंथु निफनला यामळसिंधु
तेथ सैंहाद्र खंडानुवादु । आत्मतीर्थ महात्म्य ।। ३६

तेयांसीं ग्रंथीं दीधली असे संस्कृतें । ते सोडौनि महाराष्ट्र भाषा हस्ते
श्लोकार्थवस्तु दावैनु श्रोतेयांते ।
म्हणे मुनि कृष्णया कवि डिंभू ।। ३७

हा प्रसंगु दुसरा । कथामुख नामु अवधारां
ज्ञान होए पैं चतुरा । पंचावतारांचे ।। ३८

इति श्रीमन्महोपाध्याम्नायदीक्षितविराटदेशोपनामालंकृत-
मयंकराजशिष्य कृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ प्रकाश-
ग्रंथे कथामुखोनाम द्विः प्रसंगः ।।२।।

——: :——

३

## आत्मतीर्थ महात्म्य

श्रीपरमात्मने नमः

हे आत्मतीर्थ कथा सुहावीं । जेथें साहित्य सिद्धांत गोडी नीचनवी
ते श्रोतेयां म्हणो आइकावी । तरि महिमां नव्हे ।। ३९

जैसें देखौनि रत्न खडें । तेंथ जोहरीं लुब्धौनि पडे
जे वस्तु जेथ कां न घडे । तेथ ग्राहीकें धांवेति ।। ४०

विषयां गिवसीं पात्र कळिकां । ज्ञातृत्व वक्ता देखोनि पृच्छकां
कां दातां आइकौनि याचकां । सुटे चटपट ।। ४१

तृषाक्रांतु कांईं जीवनें प्रार्थिला । कीं इंदुने भुजंगु विणविला
की विज्ञानें इंद्रियां आग्रहो केला । कीं विषयो पंचकें ।। ४२

म्हणौनि आत्मतीर्थ महात्म्य कथा । परिसा म्हणावी न लगें सर्वथां
जे पवित्र करी सकल तीर्थां । की लोकत्रयांसीं ।। ४३
आइका निमिषारण्यीं बद्रिकाश्रमीं । ऋषिकुळें नांदतांति स्वधर्मीं
तेथ वेदागम कथा बंधक्रमी । रचितां व्यासु होओे ।। ४४
तेथ रोमहर्षणांचा जो मुत । तो ऋषीमाजी पुराणीक विख्यात
नारदु देततांप्रति निरोपित । वेदादि सकळै कथा ४५
देवलो पुराणीकु पितृलोकींचा । असितऋषी संवादकु तेयांचा
शौनक संवादकु तो सूतांचा । ऋषी मंडळां माजी ।। ४६
आइकां कव्हणी एकीवेळी । बद्रिकाश्रमी सहीतु ऋषिकुळी
आसीतु देवलऋषी जवळी । येतां जाहला ।। ४७
सवें ऋषीगण सकळ । होताअे वेदागमु श्रुति कल्लोळ
ऐसा आश्रमु पावला मंगळ । देवलऋषीचा ।। ४८
तेथ घालौनि दर्भासनें । ऋषी बैसवीले सन्मानें
तंव सपर्या मांडिली असें तेणें । देवलऋषींची ।। ४९
यथोक्त मंत्रे करौनिया पूजा । साष्टांगी नमौनि ऋषिराजा
प्रश्णु केला बरवियां ओजा । तो अवधारा पां ।। ५०
असीत म्हणे ऋषी उत्तमा । न्यायशास्त्री महेशें गौतमां
श्रीदत्तपदांकितु महिमा । निरोपिली तीं स्थानीं ५१
मातापुर आत्मतीर्थोत्तम । पांचाळेश्वरू जयां नाम
तेयांमाजी आत्मतीर्थ महात्म्य । निरोपावे आम्हां प्रती ५२
प्रश्न आइकौनि असिताचा । अंतरी संतोष जाला देवलांचा
उचंबळैला निरोपणाचा । तो कैसा सांगो ।। ५३
कीं तो असित जिज्ञासामृत चंद्र । देवल तो ज्ञानजल समुद्र
निरोपण भरितें चढिलें सभद्र । भरलियां ऋषिनदीं ५४

कीं असितु द्रावकु जाणा । देवल कांतिलोहो दर्पणा
प्रश्नु करितां सूटिलें जीवन । निरोपणाचें ५५
देवल म्हणे असिता । तुवां पुसिली अपूर्व कथा
जेणें कलिमलें नासती आइकितां । जन्मु सुफल होओे ।। ५६
नानाविधे जनीं तीर्थे । तामसु जनु वंदिती तेयांतें
सहित्रें खेचरें प्राकृतें । जीवुघानिकें ।। ५७
तेयां तीर्थाचि जनां आवडी । तेथें जाऔनि मारिती मेंढी बोकडी
जोडिती नर्कांचिआं कोडी । भोगितां न सरें सृष्टीं ।। ५८
एके मारिती कोंबडीं । एकु सूकराची रेगे तोडीं
एकें लागेति बगाडी । आंगे टोचौनिया ।। ५९
एकां करीति कडेलोटण । एकां मद्यमांसाचे अर्चन
एकां मनुष्य रक्ताचे सिंचन । करीति तामसु भक्ती ।। ६०
एकें बैसेति दांतवणी । सेवटीं पूजिती मातंगिणी
हे विप्राहि आदि करौनी । एरां कांई म्हणावे ।। ६१
मसनियांची यात्रा नवसिती । तयांचेंनि नांवें रोटिगें खाती
परि परमेश्वर आराधना न करिती । कव्हणीं ही काळीं ।। ६२
द्वारकें वारानशीं जातीं । कुळदैवता माणिती भगवती
मद्याचेंनि नावें पूजिती । घट मथिताचें ।। ६३
चहूं वर्णाचे गुरू म्हणविती । खंडेरायाचें भंडारू लाविती
विडें उचलौनि घुर घुरितीं । मंडळाचिआं परी ।। ६४
जिए कां अंत्यज दैवतें । तिए विप्रे माणिती कुलवंतें
परमप्रीतीं पूजिती तेयांतें । सांडौनि ईश्वरांतें ।। ६५
हें बोलिलें असें व्यासें । असितां सावधानै परिसें
परमेश्वरां सोडौनि जन जैसें । भ्रमलें असतीं ।। ६६

जो परमेश्वरां नाठवी कव्हणीं काळीं । अखंड रत कर्मीं अमंगळी
तो जरी स्मरे मरणकाळीं । परमेश्वर नामु ।। ६७

अथवा एकाधी पीडा पावतां । कां वृक्षा वरौनि पडतां
कां नदी माजी बूडतां । स्मरें परमेश्वरांतें ।। ६८

तरि फिटौनि कर्मांचिआं आगळा । तुटौनि भव शांखळां
मुक्त होऔनि मंगळा । पावें परमगतीं ।। ६९

मां जो निरंतरू परमेश्वरां ध्याअे । तो मुक्त होईल हें नवलु काअे
परि तेयांतें न पूजिती पां हें । जन कलियुगीचें ।। ७०

म्हणौनि परमेश्वर पदांकितु तीर्थेंवीण । सकलतीर्थें निर्फलें जाण
नव्हेतीं मोक्षदायकें भ्रमण । न चुकें कदां ।। ७१

म्हणौनि परमेश्वर चरणांकितें । तिअें मोक्षदायकें तीर्थें
तेयां माजी आत्मतीर्थ महिमा तूं तें । सांगैणु आतां ।। ७२

भक्ति आणि मुक्ती दायक । आत्मतीर्थां सम नाहीं आणिक
जें स्मर्ण मात्रें सर्व पातकां । क्षयो करी । ७३

इअें मानव लोकीं जे नर । आत्मतीर्थां वासना धरितीं निरंतर
तें निःपापें बैसति निर्धार । सनातन ब्रह्मलोकीं ।। ७४

जें जें महा असंत दोष । कर्मसंभव बहुंवस
तेयां सर्वांचा होअे नाश । आत्मतीर्थु सेविलेयां ।। ७५

चोरी सुरापाणु मित्र द्रोहो । ब्रह्महत्या गुरू द्रोहो
'आइकें महापातक समुहों । जाति आत्मतीर्थ स्नानें ।। ७६

जेयां आत्मतीर्थां स्नानु घडे । तरि बहूंत जन्मार्जित पाप संविघडे
पुण्यरूप जन्म रोकडे । होअे जनांमाजी ।। ७७

याचक धनवंतां स्तवी घडी घडी । तो तेयांचें दारिद्र फेडी
आत्मतीर्थ स्तवनें कोडीं । तूटिती बंधनाचियां ।। ७८

जें श्रीदत्ताचें क्रीडास्थान । आत्मतीर्थ म्हणजे महातीर्थ गहण
तेथ जो करी पूजार्चन स्नान दान । तो कधी शोकांतें न पवे ७९
जो आत्मतीर्थी योगीश्वरातें । भोजन दे शूचीमंत ब्राह्मणांतें
तेयांचे पूर्वज मूंचति महादुःखातें । मुखधामा पावती ॥ ८०
शुक्लपक्षी चैत्र मासीं । महापर्वी भूत चतुर्दशीं
जो प्रयाण करी आत्मतीर्थासी । तो निःपापु होअे ॥ ८१
जे का भावें आत्मतीर्थी । पंचपर्वी पूजा करीती
तें मागौते डोळां न देखतीं । संसार यातनां ॥ ८२
दैत्यां दानवांचिअें धाडी । ब्रह्मादिकांची सुखें होती देश धडी
ते आत्मतीर्थी पूजिती दडवादडी । ते जातीं अक्षय पदां ॥ ८३
जेथ पांचाळ आप्त विज्ञानेश्वर । राजाळ तेजाळ नृपवर
हे पांचै हीं तरलें भव-सागर । आत्मतीर्थ स्नानें ॥ ८४
देवल म्हणे मज प्राकृताचा । महिमा न कळें आत्मतीर्थाचा
जेथ श्रीदत्तात्रेय प्रभूचा । क्रीडा संबंधु ॥ ८५
ऐसें आइकौनि वचन । असीतु पुसे ऋषि वर्धन
कवणु पांचाळु आप्त कवणु । विज्ञानेश्वरु ? ॥ ८६
कवणु राजाळ कवणु तेजाळ । हें स्नानें कैसें तरलें भव-जल
हे कथा रहस्य मूळ । श्रवण करावीयां ॥ ८७
असिते पृच्छिले आख्यान । ते देवल करैलु कथन
ते श्रोतां परिसांवे पूण्य पावन । म्हणे कृष्णया कवी डिंभु ॥ ८८
हा तीसरां प्रसंगोत्तम । जेथ बोलिलें आत्मतीर्थ माहात्म
आइकितां होअे सुफल जन्म । श्रोत्तेंयांचे ॥ ८९

**इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराटदेशोपनामालंकृत-
मयकराजशिष्यकृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ-प्रकाश
ग्रंथे महात्मोनाम त्रितीय प्रसंगः ॥३॥**

४

## आत्मोत्तम पांचाळ भेटि

श्रीपरमात्मने नमः

तंव देवल म्हणे ऋषी शिरोमणी । तुआं प्रश्नु केला अपूर्व वाणी
जेणें श्रीदत्तांचा चरणीं । रंगे चित्तु ।। १०

तरि आइकें सावधानें । त्रेतारंभी दिशें दक्षिणें
महापवित्र जाणै । पांचाळ देश तो ।। ११

तिअें देशीं चा राओ पांचाळ । जो नित्य धर्में राणीव कुशल
तो द्वादशाश्वमेध मंगल । करितां जाला ।। १२

तेयां चे पुत्र च्यारि विख्यातु । एक विज्ञानेश्वर दूसरा आप्तु
सर्वविद्या निपूण नीतिमंतु । हें दोघै जनैं ।। १३

राजाळाणि तेजाळु हे दोन्हीं । धनोर्धर विद्याकुशल रणमुर्ध्नी
राजा शोभें चौघां पुत्रां करौनी । च्यान्ही पुरुषार्थें ।। १४

तिअें पांचाळ नगरीं भला । श्रोत्री एकू ब्राह्मण कुळीं जन्मला
देवशर्म्मा नावें भक्त होतां जाला । श्रीदत्तात्रेयांचा ।। १५

तेयां देवशर्मयां पासौनि पवित्र । जन्मैला आत्मोत्तमु नावें पुत्र
जो कां श्रौत्रियाचारें निपुण विद्यापात्र ।
वेदविदां वरिष्ठ जो ।। १६

तेणें आत्मोत्तमे आइका । सहस्त्रवर्षें ब्रह्मचर्यें देखा
अभ्यार्थिलें श्री दत्तात्रेय कैवल्य नायका ।
ध्यान पूजा विधानें ।। १७

नानां विधें सूक्तें स्तोत्रें कीर्तणें । दंडवत जये आर्त्तिवचनें
गीत नृत्य मंगल वाद्यावनें । सानुराग पुर्वकु ।। १८

ऐसीं भक्ती करितां आनंदविभु । प्रसंन होऔनि श्रीदत्तात्रेयप्रभु
निजरूपां दाऔनि सुलभु । जाला तेयांसीं ।। ९९
देखौनि श्रीदत्तात्रेय मूर्ती । आत्मोत्तमु संतोषैला चित्तीं
जेंवि अवचटें अनर्घ्यु सांपडे हातीं । जोहोरियांसीं ।। १००
मग षोडशोपचारानुक्रमें । महा पूजा केली आत्मोत्तमें
स्तविता जाला आनंदु संभ्रमें । श्रीदत्तात्रेयां ।। १०१
मग देवादि देओ आपण । आत्मोत्तमासीं होऔनि प्रसंन
देतां जालां वरदान । माथां ठेऔनि श्रीकरू ।। १०२
विज्ञान सामर्थ्यें अवधारा । प्रकटैलियां तेयां द्विजवरां
सर्वसिद्धीं बाणलियां उदारां । जालें दिव्यरूप ।। १०३
तेयां आत्मोत्तमाचा मंदिरीं । गुढी तोरणें मंगलोच्चारीं
आनंद संभ्रमु निरंतरी । होतु असें ।। १०४
तेथ यथाधिकारें मंगला । घेऔनि पंचार्त्तियां परिमळा
ओंवाळौं एती श्रीचरण कमळां । श्री प्रभुचियां ।। १०५
वार्त्ता प्रवर्त्तली नगरांतु । जें आत्मोतमालईं प्रकटला श्रीदत्तु
ऐसां जन बोलति एकांतु । घरोंघरीं ।। १०६
तें आइकें पांचाळ-राओ । ह्मणे पां कैसा जाला नवलाओ
जे आह्मां जोडला देवराओ । आराधिलियां विणु ।। १०७
मग चौघां पुत्रां सी आदरें । दर्शनां निगाला स परिवारें
दुमदुमीनिली पाताळ गव्हरें । नादीं निशानांचां ।। १०८
गुढीयां पाल्लव श्रीगिरीं । हस्तीं कीकाटु वारुवांचा हिंसकारी
मंगल भेरीं वाद्यंत्रां चा गजरीं । निगाला राओ ।। १०९
उताविळपणें अतिशअेंसीं । चरण चारीं चालिलां भावेनसीं
तेथ महाद्वार प्रवेशीं । दलभारू थोकविला ।। ११०

पुत्रींसीं महाद्वारू प्रवेशला । दुसें लंघौनि राजांगना आला
तंव सपूजीतु आसनीं देखिला । दिव्य प्रभु ।। १११

उत्तमें दिव्यांबरें वस्त्रें । रत्नालंकरणें विचित्रें
देओ ओंवाळौनि कीर्त्तिपात्रें । दानें तृप्त केलीं ।। ११२

मग दर्शन करौनि लोटांगणी । माथां ठेविला श्रीचरणीं
हृदई धरिले आलिंगौनी । क्षण एकू ।। ११३

तेव्हेळीं श्रीमुखें श्रीकरें । आस्वासौनि म्हणतिलें पुरें
दोन्हीं करां जोडौनि राजधरें । मग पुढां उभा ठेला ।। ११४

चोघें पुत्र विणत्कंधर । साष्टांगें घालितीं नमस्कार
चरणां वंदौनि समोर । तेहीं उभें ठेलें ।। ११५

सात्वीकु दाटले आंगां । ताटस्तु पाऔनि जालें स्वरभंगां
आश्रु श्वेदाचियां गंगा । वाहाति देहीं ।। ११६

भिआलें देखौनि संसार मार्गु । तें खूण दाबिताअे गात्रभंगु
विवर्णत्वें बाहिरीं किल्मिष रोगु । दर्शन भेषजे ।। ११७

देहक्षेत्रीं प्रेम अंकुरैलें । तैसें रोमांचु दाटैलें
प्रलयाग्नि अंतराजंनु शोधिलें । नाम रत्नें जडावेयां ।। ११८

ऐसां साष्टांगभावीं व्यापिला । मग दर्शनें ज्ञानोदयो जाला
मग सह पुत्रीं विणवितां जाला । झळंबौनि करुणारसें ।। ११९

म्हणे जी अविद्यावशें श्रीहरी । आम्हीं पडिलो संसार-कुहरीं
तेथौनि निगावेयां बाहिरी । केलें नानां उपाअें ।। १२०

शर्णं गेलों देवतांसीं । तेहीं कर्म दीन्हलें आम्हां सीं
तेणें अधिकांचीं पडिलो पाशीं । संसृतिचिआं ।। १२१

धरौनि आगमांचें पदरूं । चढलों आयुष्य फळांचे डोंगरूं
अंती केलासें चूरू । कडेंलोट करौनियां ।। १२२

मग शरणु गेलों पुराणां । तिअें खालौंति फिरैति गणमणां
तीर्थ क्षेत्र वृत दानां । फेरिं घातिलें ॥ १२३
लागलों कामशास्त्रांचिअें कासे । तवं तेथ सार्वभौम फळ असें
परि संसृति फळ नासे । ऐसां न देखो ॥ १२४
मीमांसा धर्मशास्त्रु अनुष्ठिलें । तेणें इंद्र-पदां नेऔनि बैसविलें
पुण्य सरितांचि लोटिले । खालौते आम्हां ॥ १२५
आचरलो योगशास्त्रीची मतें । साधिले अजरामरत्व काळवंचन तें
संहारु पातलेआं मागौते । भष्मचि जालों ॥ १२६
धरिला सांख्य शास्त्राचा आधारू । भोगिला रसाधिपत्व फळ भारू
परि न चुकेचि संसारू । याता यातनें चा ॥ १२७
अंनरीं धरिला वेदांतांचा धडा ।
तवं तेणें राहिला परमेष्टच फळीं औकडा
कैवल्य दुर्गाचा हुडा । न टकेंची तयां ॥ १२८
धरिली न्यायशास्त्राची आस । तेथ फळें बोलिली निःश्रेयस
परि तुझेंनि प्रेमरसे-विण निरस । ते कांईं करावे ॥ १२९
ऐसें आम्हीं जीवु संसारी । गुंतौनि गेलों नानां मतांतरीं
भ्रमण करितां येरझारी । न धरौ शीणा तें ॥ १३०
एकु म्हणतीं अविद्या मायामय जालें । ब्रह्मेंची जीवु प्रपंचाकारिलें
परि जीवे प्रपंचातें ज्ञानकेलें । आणौतेचीं । १३१
एकु म्हणती मिथ्या मृग-जल । अविद्यासंगे प्रतिभाषे निर्मल
ब्रह्मीं उठेति तरंगाचे कल्लोळ । तेथेंचि बिलयां जातीं ॥ १३२
परि प्रारब्ध कर्म ना भोगक्षओ । ऐसिआं श्रुतीं बोलेंति भाओ
कांईं स्थिती-रचना-प्रलओ । कवणां सी हें नेणतींची ॥ १३३

एकु म्हणतीं कर्मेंचि तारक ईश्वर ।
कर्मेंची पाविजें ब्रह्मादि फल भार
परि देवतां परमेश्वर निर्धार । न कळेची तयां सीं ।। १३४
एकु घरींची मोक्षु बोलेति । एकु पिंडीची ओळखावें म्हणती
नीडेनिश्वरू एसें नेणतीं । ब्रह्मज्ञानें विण ।। १३५
एकु नेत्र लाऔनि दांवितीं अंधःकारू ।
म्हणती कांहीं दिसतो कां भिन्नाकारू
परवस्तूचा निर्धारू । तो ऐसाची जाणावा ।। १३६
एकु संतोषलें छाया पुरुष चिन्ह । एक म्हणतीं थोर नाहीं जीवां विण
यातायात चौऱ्यांशी फिरण । हे इच्छा कर्मवशें ।। १३७
एकु तिमिर शून्यें अवलोकितीं । एकु बांधिलें काळज्ञान-मतीं
तेणेंची आपणेयां म्हणवितीं । महाज्ञातु ।। १३८
एकु दाऔनि नानां चेटक-मतें । ईश्वरू म्हणवितीं आपणेयांतें
झकवींति लोकांतें । नानां पदार्थीं ।। १३९
एकु मढी मसानें भूतांतें । जागृत करौनि तयांतें
म्हणती हाचि विठ्ठलु श्रीकृष्ण यातें । नितांति भजावे ।। १४०
ऐसियां भ्रमणीं पडीलेयां जीवां । कव्हणीं काळीं नाहीं विसांवा
तुज वांचौनि गा परदेवा ! । रक्षिता कवणु ? ।। १४१
करौनि माया-वेषांगिकारू । जीवां तारावेयां भव-सागरू
ऋषिकुळीं धरौनि अवतारू । करुणां तारू जाला ।। १४२
मती डोंडाचे पाइकु आम्हीं । लागलो काम-तस्करांचा संगमीं
म्हणौनि माया चतुर्विध कर्मफल भ्रमीं । फिरीतसो ।। १४३
ते चुकावेयां आम्हीं पाहों भंवतें । तंव कव्हणीं न देखों तेथें
न कळें कवण पुण्य होतें । जें लाधलो नर-देहां ।। १४४

तेथहीं जोडिला अपराधु । जे प्राप्त जाला राजबंधु
परि आत्मोत्तम प्रसादें कृपासिंधु । तूं सांपडिलासी एथें ।। १४५
थोर भीतसों चतुर्विध कर्मा । आतां अव्हेरूं नको जी आम्हां
झटती धावौनियां भवभ्रमां । पासौनि सोडवी आमुतें ।। १४६
जय ऋषिकुल दीपकात्रिनंदना ! । जय अनसूय पितृकुलोद्धरणा
जय जया जी अरूपा रूपघना । दिव्यमूर्ती ।। १४७
जय पंच कुळ शक्ति वैद्या । जय भवभयहरणा सुवैद्या
जय अमोघदर्शी असाध्या । साधलासीं ।। १४८
म्हणौन घातलें लोटांगणां । माथां ठेऔनि चुंबिलें चरणां
तंव प्रसंन होऔनि देवराणा । स्पर्शितां जाला श्रीकरें ।। १४९
मग लाऔनि वाद्यावने मंगलें । महापूजा केलीं रायां पांचाळे
पुनती जोडौनि करकमलें । विणवितां जाला ।। १५०
जी जी ! माझेयां आश्रमां । आरोगणें बीजे कीजो पुरुषोत्तमा !
पावन करावे जी आम्हां । कुटुंबेनसीं ।। १५१
जो त्रिदशवरां दुर्लभु । अमोघदर्शी श्रीदत्तात्रेयप्रभु
तो पांचाळासी जाला सुलभु । आरूढैला सुखासनीं ।। १५२
चौ हटां राजविदीं हाटवटियां । उभिली मखरें तोरणें गुढियां
सडे संमार्जनें करीति कामिनियां । भरीति रंग-माळां ।। १५३
पांचाळ रायांचा आवारीं । त्रिविध चंदनाचें सडें घालीति नारीं
चौकु भरीति विचित्रां परी । नवरत्नांचें ।। १५४
सभामंडपु शृंगारिलें कुसरीं । अनर्घ्यांची वित्तानें बांधिली वरी
भीती भंगु लाविलें कुसरी । सुगंधी पुष्पांचें ।। १५५
आत्मोत्तमा सहितु ब्राह्मण कुळ । रायें हाकारिलें सकळ
मंत्रध्वनी करीति मंगल । चालिती सवें ।। १५६

येतीं ऋषीं आणि मुनीं । देखां पुढारां चालेंति स्तोत्रें स्तवनीं
राजा पुढां कांबि-कारू होऔनी । सारि मांदियाळें ॥ १५७
नगरीं नर नारीं धूपार्त्तियां । करीं घेऔनि मंगलार्त्तियां
ओंवाळणी करौनि कुरवंडिया । सांडिती नवारत्नांचियां ॥ १५८
आत्मोत्तमाचेयां महाद्वारा । एक दोंनि मंडपु दीधलें सुविस्तारां
तळीं रंग-माळिकां भरलियां अपारा । पंचविध पुष्पांचियां ॥
ऐसेंनि मंगलोत्साहेसी । देवराओ चालतु वाद्यंत्र गजरेसीं
वेधें नर नारी चित्र-लेपें कां जैसीं । न लवींति पातणियां ॥ १६०
पुष्पवर्षाओ करीतिं पौरजनां । महाद्वारां समीपु गेला देवराणा
तेथिची देखोनि शृंगारु रचना । तोखलें आत्मोत्तमादिकु ॥ २६१
मंडपु देखिला महाद्वारींचा । जो गुंफौनि केला इंद्र नीळाचा
भवंतां फेरू पद्मरागाचा । झळंबतु दिसें ॥ १६२
कीं अधिकारु जाणौनि रायांचा । अथवा यावा होईलु श्रीदत्तांचा
उचित मंडपु बिज भूत-तत्वांचा । घेऔनि आला कराळी ॥ १६३
जैसें कां कुंजरूं दीघडें । शृंगारौनि उभे केलें देहुडें
कीं तें अंधकाराचे वीर ऊंचवडें । पांहों आलें श्रीदत्तां ॥ १६४
महाद्वारु प्रवेशला अनंतु । शृंगार रचनां निहाळितु
आत्मोत्तमादि माथां तूकितु । प्रवेशलें मंडपीं ॥ १६५
रायांचा देखौनि भक्ति-भाओ । रत्नासनोपविष्टैला देवराओ
आत्मोत्तमादि ब्राह्मणां ठाओ । दाविला बैसांवेयां ॥ १६६
सभा बैसींनिली घणदाट । वाणितीं रायांचे भाट
करीति महा गजबजाट । महाघोषीं ॥ १६७
म्हणती धन्य धन्य राजशिरोमणी । जो न पविजें वेदांदि पुराणीं
तो आम्हीं देखिला नयनीं । तुझेंनि प्रसादें ॥ १६८

विबुधांगनां जिंतिलियां बरवेंपणे । तियां करौनि श्रृंगारू भूषणें
करों आलियां ओंवाळनी निंबलोणें । आंगनां रायांचियां ॥ १६९
कीं ओंवाळावेयां श्रीदत्ता । रीग नाहीं कहींची देवतां
रूपें धरौनि आलियां मज पांता । राणियांचीं ॥ १७०
असों हें ओंवाळनी जालियां । उचिता दान देऔनि पाठवीलियां
तंव पुढां उभाठेला मर्दनियां । राओ आपण ॥ १७१
देवां जालें मर्दना मादने । आत्मोत्तमादिकां जालीं स्नानें
ओळगविलीं रत्नालंकारु भूषणें । दिव्यांबरेसीं ॥ १७२
मग आरोगणा जाली पंक्तीं । सरितां संगम ऋषी पंक्ती
कीं दत्त ब्रह्मगिरी समीपु शोभेति । पंक्ती तीर्थ माळां ॥ १७३
कीं दत्त–सुवर्णाचळा । जवळि पंक्ती कुळाचळ दळ माळां
कीं आस्वादौ आलियां श्रीचरण कमलां । ऋषी भृंग पंक्ती
विप्र करीति वाढावाढीं । षड्रषान्नाचियां परवडी
देओ आरोगितुसें आवडीं । भक्तीरसीं ॥ १७५
जाली आरोगणा गुळळा । आचमणें जालीं सकळां
कर्दम चर्चौनि गंधाक्षतां पुष्प-माळां । फल तांबूल समंपिलें ॥
मग देवांचा ताट-प्रसादु राअें । पुत्र कलत्रांसीं घेतिला उत्साहे
आनंद संभ्रमें आत्मा न माअे । देहा माजी ॥ १७७
मग पंचार्त्तिआं ओवाळिलें । पुनती सूक्तीं स्तवन केलें
राओ म्हणे आजि जन्म सुफळ जालें । श्रीचरण दर्शनें ॥ १७८
जी जी ! परमानंद मूर्त्ती । जेणें आमुची होअें संसारु निवृत्ती
ते करावेयां कैवल्य-पती । म्हणौनि चरणु वंदिले ॥ १७९
ऐसीं देखौनि रायाची भक्ती । जाणौनि अंतरीची आर्त्ती
मग प्रसन्नु जाला आनंद-पती । पांचाळरायांसीं ॥ १८०

मग श्रीदत्ते करुणा-सागरें । करस्पर्शौंनि अमोघवाणी उत्तरें
वरदानु दीधलें उदारें । ते अवधारां पां ।। १८१
म्हणितिलें तंव दुर्जनु दोंनि राक्षस । तेयां प्रसनु जालासें महेश
तेणें उन्मत्त होऔनि बहुवश । दुषितीं वेद–मार्गां तें ।। १८२
पिडां देतीं ऋषीमुनी लोकांसी । तेयांतें वधौनि विजया होसीं
ब्रह्मज्ञाचा कुळीं जन्मौनि पावेशी । ब्रह्मपदां तें ।। १८३
ऐसें देऔनि तेयांसीं वरदान । मग अदृश्यें बीजेकेलें आपण
आत्मोत्तमे हीं केलें प्रयाण । ब्रद्रिकाश्रमासीं ।। १८४
ययां अनंतरे कथा । तें राक्षसु पांचाळें वधिलें असिता
श्रीदत्ते तेयाचेयां प्राय:श्चित्तां । रचिलें आत्मतीर्थ ।। १८५
तंव असितें म्हणितिलें देवलासीं । पुढील पवित्र कथा ते कैसी
तें श्रवण करावी ऋषी । म्हणौनि केला नमस्कारू ।। १८६
मग असित ऋषी प्रती । देवल सांगें अतिप्रीतीं
मुनि कृष्णया म्हणें संत श्रोतीं । अवधारावी तें ।। १८७
हा चतुर्थ प्रसंगु पवित्र दुर्लभू ।
आत्मोत्तमां पांचाळां भेटला श्रीदत्तप्रभू
तो आइकितां होये पर–लाभू । श्रोतें यांसीं ।। १८८

**इति श्रीमन्महोपाध्याम्नायदीक्षितविराटदेशोपनामालंकृत-मयंकराजशिष्य कृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ प्रकाश-ग्रंथे आत्मोत्तम पांचाळ भेटि नाम चतुर्थ प्रसंग: ।।४।।**

५

# दलभंजन वध

श्रीपरमात्मने नमः

ऐसा श्रीदत्तात्रेय प्रभु प्रसंन जाला । रायां थोर आनंदु वर्त्तीणिला
मग मुनीतीं राज्य करितां जाला । चाऱ्हीं पुत्रां सहितु ।।१८९
राणीव चालवी नीती कर्मे । भक्तीकरीं श्रीदत्ताची स्मरण संभ्रमें
नगरजनु नांदिताअें वेद-धर्म्में । अखंडितु ।। १९०
स्पर्श जाला श्रीदत्ताचा चरण कमळीं । स्वानंदे डोलें मही तळीं
राणीव कीजेतु भू-पाळी । नानां-देश-मंडळीं ।। १९१
आत्मोत्तम गेलियां बद्रीकाश्रमासीं ।
पाठी तेयांचे शिष्य आणिकें ऋषीं
दंडिकारण्यीं राहिलें निश्चयेंसी । करीति तपानुष्टानें ।। १९२
तंव त्रेतारंभीं तिअें काळीं । पौलस्त पुत्रु दोघें महा बळी
कुंभ आणि निकुंभ जन्मलें महिमंडळीं । ब्रह्म-राक्षसु तें ।।१९३
नेहीं दोघी ब्रह्म राक्षसीं । उग्रतपानुष्ठानें सहस्त्र वर्षीं
अष्टमूर्त्ती महादेवा सीं । प्रसन्न केलें ।। १९४
तेयां भोळा-शंकरू जाला प्रसंन । प्रकट होऔनि दीधले दर्शन
म्हणे पुत्र हो ! मागा वरदान । जें कां मनीं असैलु ।। १९५
तेही अर्चना करौनि केली स्तुती । वंदन करौनि वरदानां मागती
जे आम्हा होआंवी त्रैलोक्यें-राज्यें-संपत्ती ।
आणी युधीं वज्र शरीर ।। १९६
तंव महेश म्हणे तेयां वीरां । तुम्ही पिंपळाचा यज्ञ-स्थंभु करा
षटशतीं देवतां असुरां । आराधावियां पैं ।। १९७

तियां देतीं तुम्हांसीं वर । तेणें तुमचें होतीं वज्रशरीर
राज्य कराल हा अभयकर । तिहीं लोकीं चें ।। १९८
ऐसा देऔनि दोघां वर । अदृश्य जाला महेश्वर
मग मेळऔनि दळभार । आले महा-राष्ट्रां सीं ।। १९९
नगरू रचिले अचाट । जे दुर्घट महापापिष्ट
राक्षसभुवन नामें प्रकट । विशाल तें ।। २००
मग कुंभोदर आणी निकंभु । तेहीं केला यज्ञाचा आरंभु
स्थापिला यज्ञ-स्थंभु । पिंपळाचा ।। २०१
यज्ञ मांडिला धुरंधर । भू गोळ कीं न सटे धूम्र
हो काज ब्रह्मकवचीं अंबर । जालें तेयांचें ।। २०२
यज्ञ ज्वाले जळैल गव्हरीं । म्हणौनि पन्नकीं सांटविला उदरीं
अंतर पोळले पणें अद्यापी फुत्कारी । बाहिरीं टाकितांती ।।
ब्रह्मराक्षसाचियां मंत्रध्वनीं । थरथरां कांपायली मेदनी
ते अद्यापी राहिली रिगौनी । कुळाचळा तळीं ।। २०४
तेयांचां मंत्रघोष स्वरीं । दचकौनि इंद्र जाला भगींद्र शरीरी
भयांभेणें चंद्र सूर्यो अस्तागिरी । आड पळालें ।। २०५
मंत्रोच्चारा भेणें अवधारी । एके देवतें दडालीं गिरी-कंदरीं
एकीं उडियां आडी विहीरीं । घातैलियां तैं ।। २०६
ऐसा त्री-भुवनीं जाला कल्लोळु । ब्रह्मांड कवचीं झोंबे यज्ञजाळु
असों हें अव्हाणिला मळु । साहीं सटींचा ।। २०७
आइकां वेताळी आणि कराळी । काळ रात्रिका आणी कंकाळी
काळकर्णाणी महाविशाळी । आणी महासत्या ।। २०८
यां साहीं सटीं मुख्यां अवधारां । घोर रूपां महा भयंकरां
यज्ञ मंडपीं तेयां अवस्वरां । प्रकटीं जालियां ।। २०९

पूर्णाहुती घालौनि मघमांसाची । पुजा केलीं सा सटींचीं
मंत्र स्तोत्रीं तेयांची । स्तवनें केलीं ।। २१०

मग प्रसंन होऔनितियां । म्हणतीं माग प्रसंन जालों राया
तंव दोघें नमस्कारौनियां । मागतीं वरां ।। २११

म्हणती युद्धच काळीं निर्धारें । होआंवी दोंघांचीं वज्र शरीरें
पराजयो आमुचेनि करें । होआंवा सुरां नरांचां ।। २१२

तंव देवतां म्हणती राजोत्तमा । तुम्ही संतोषवीलें आम्हां
मागीतिलें तें होईल तुम्हां । म्हणौनि अदृश्य जालियां ।। २१३

देवले म्हणितिलें असिना ! । जेथें प्रकटैलियां सांसटि देवतां
सासटीं-पिपळगाओ वसता । जाला तेथेंचीं ।। २१४

ऐसा लाहौनि वरू । कुंभोदराणी कुंभ दोंघे वीरूं
राज्यें करीति सुहर्षें निर्भरू । राक्षस भुवनीं ।। २१५

धाडी घालींति त्री-भुवनीं । देवां दानवां पराभवीति रणीं
युधीं समोरु राहों न सकें कव्हणीं । अजीतें वज्र-देही ।। २१६

करभारु मागेति देवांसी । द्रोहों आचरतीं वेदमार्गासीं
निंदीति परमेश्वर भक्तांसी । नावडे सदाचारु ।। २१७

याचकां करीति मानखंडणा । हिंसितीं योगियां तपोधनां
धनां पीडीतिं ऋषी ब्राह्मणां । मोडिलें आश्रमु ।। २१८

लोकांची धनधान्यें हीरीति । चहूं वर्णांचियां नारींशी व्यभिचरीति
हाहाभूत जालें क्षितीं । तिअें काळीं ।। २१९

महाराष्ट्री दंडकारण्यीं । आत्मोत्तमाचे शिष्य होतें अनुष्टानीं
ते पराभविलें मोडौनी । आश्रमु तेयांचें ।। २२०

मग तें गेलें बद्रिकाश्रमां । वृत्तांतु सांगीतिला आत्मोत्तमां
नेलें हरौनी आमुचेयां आश्रमां । ऐसें सांगतें जालें ।। २२१

तंव आत्मोत्तमु म्हणें शिष्यांसीं । तुम्ही जावे पांचाळ नगरांसीं
भेटौनि सांगावे पांचाळांसीं । समाचारू हा ।। २२२

श्रीदत्तात्रेय प्रभुचें वरद । तेयांसी असें प्रसिद्ध
तो तुमचे कार्य करैल सिद्ध । नव्हें आणिकां चें नीं । २२३

ते शिरीं आज्ञा वंदौनी । आत्मोत्तम शिष्यें निगालें तेथौनी
पातलें राजधानीं । पांचाळ रायांचीं ।। २२४

राओ परिवारेंसीं । मंडपीं बैसलासे पुत्रेनसीं
तंव जंसें आदित्यु आलें मंडळां सीं । तैसें येतां देखिलें ।। २२५

राअें साष्टांगी नमस्करौनी । आदरें बैसवीलें सिंहासनीं
आर्चन वंदन करौनी । स्तविता जाला ।। २२६

म्हणे या जीवां लागैला संसार भुजंगु ।
जरि पावे साधु-धन्वंतरीचा लागु
तो ज्ञानामृतें जीववी चांगु । नाशी भव विषांतें ।। २२७

शरश्चंद्रागमोदय काळीं । शास्त्र निरोपण मळ्याचळी
अधिकारु जन झाडि मंडळी । वेधीं ज्ञानु बावनें ।। २२८

तें तुम्हीं साधु सुधाकरूं । देखौनी जनात्मक चकोरू
घेतां ज्ञानामृत धारू । तृप्त होतीं ।। २२९

कवणें कार्यें चीजें केलें । तें निरोपावें जी वहिलें
मग तें सांगतें जालें । रायां प्रती ।। २३०

महाराष्ट्री दंडकारण्यीं । आम्हीं होतों तपानुष्ठानीं
तेथें उदैले ब्रह्म-राक्षसु दोनी । कुंभोदर निकुंभू ।। २३१

तें पुलस्त्य ऋषीचें कुमर । तेयां अष्टमूर्ति-महेशाचां वर
तेणें बळें दुष्टाचार । आचरितांति ।। २३२

मारिलें ब्राह्मणु संन्यासी । पीडा करितांति सकळां जनांसीं
चतुर्वर्गाचिया नारींशीं । व्यभिचारू करीति ।। २३३
ऋषींचें आश्रमु मोडिलें । दंडकारण्यु ओस जालें
वेदमार्गी दूषिलें । कुंठिलें धर्माचारू ।। २३४
पराभव केला आम्हां । आम्हीं गेलों बद्रिकाश्रमां
श्रुत केलें आत्मोत्तमां । अघवें वृत्तांतु ।। २३५
तेणें आज्ञापिलें आम्हांसी । जे तुम्हीं जावें पांचाळ नगरांशीं
श्रुत करावें रायांसीं । तें कार्य करैलु ।। २३६
श्रीदत्तात्रेय देवें वरू । तेयां दीन्हलासें पुढारु
तेयांचेंनि हातें निर्धारु । मृत्यु होईल तेयांचा ।। २३७
तरि आत्मोत्तमाचेंनि आज्ञावसें । आलों तुज सांघावेयां दोषें
आतां जें तुम्हां उचितु दिसे । तें करावे पैं ।। २३८
तंव राओ म्हणे माझें भाग्य थोर । जें तुमचां काजी वेचें शरीर
श्रीदत्तात्रेय-प्रभुचां वर । करैण साचु ।। २३९
देऔनि स्नानादि आरोगणा । पूजाकरौनि यांति अनुज्ञा
या नंतरे पांचाळराणा । कांई करितां जाला ।। २४०
चौंघे पुत्र अतिरथिअें योद्धार । सवें घेऔनि चतुरंग दलभार
वारूं करीति हिंसकार । दाहा कोडी ।। २४१
आठ कोडीं रथांचें घडघडाट । सा कोडी कुंजरांचें कीकाट
पाय दळ चालिलें घनदाट । अर्बूज एक ।। २४२
मार्गीं चालतां दल भारू । लागलें वाद्यंत्रांचे गजरू
एतां जाला नृप वरू । महाराष्ट्रा सी ।। २४३
तंव नगरू देखिलें महाविस्तीर्ण । जेयांचें नामु राक्षस-भुवनु
पौळीं चुंबीति गगणु । प्रति चर्या पताकां ।। २४४

नगरीं वाद्यंत्रांचीं एकी घाई । नादें कोंदलिआं दिशां दाहीं
महाकाळाचेहीं जेयां भय नाहीं । जनां तेथीचिआं ॥ २४५
भंवती उद्यानें शृंगार वाडियां । क्रीडेति कन्या कुमरें कामिनियां
लोकु परदळां देखोनियां । जाति नगरांतु ॥ २४६
असों हे वाद्यंत्र गजरे सीं । राओ पातैला निकटु नगरांसी
रचना देखौनि मानसीं । कांईं बोलतां जाला ॥ २४७
म्हणे एसनें राज्य-पदां पाऔनी । बापा ! अधर्मु कां संचरिला मनीं
साधु संता तें पीडौनी । कवणु सुखिया जाला ? ॥ २४८
रजस्तमें मूढ माणुषें । संतासीं वर्ततीं द्वेषें
तेयांचां मृत्यु समीपु असें । ऐसें वेदविदें बोलतीं ॥ २४९
ययां एसनें राज्य पाऔनि क्षितीं । वरि महेशा सारिखा सारथी
परि अधर्मां तंव काळागती । समीपुंचि आली ॥ २५०
म्हणौनि संताचां द्रोह न करावा । नीति धर्माचारू न सोडावा
मग भेणेंचि नाहीं जीवां । कलि काळांचें ॥ २५१
परि न चुके बलवत्तरु कर्मगती । आम्हीं कां पां करावी खंती
असों हें नगरां वेढौनि भू-पती । राहिला आठां दिशीं ॥ २५२
तंव नगरीचें वार्तिकारू । रायां जाणवीति समाचारू
जी ! पर सैन्यें नगरू । वेष्टिलेसें ॥ २५३
कुंभोदरू पुसें कवण भूपाळ ? । वार्तिकारू सांघती राओ पांचाळ
आईकौनि हासिनिलें सकळ । बंधुसहितू ॥ २५४
म्हणति आमुचेयां बाणां । बहूंत दी असें उपोषणा
तरि तेयांसीं देओचि आरोगणां । या पांचाळा ची ॥ २५५
कीं आमुचेयां शौर्य यज्ञकुंडीं । महाकाळ यज्ञाधिपति प्रचंडी
होमावेयां पृथिवीचें राअें बोकडीं । आणितु असें ॥ २५६

कीं आम्हीं काळाग्नि हातैवें । प्रताप दीप्तिचिअें हवावें
माजी जळों पांतातीं अघवें । भूप पतंगु हें ।। २५७

ऐसा कुंभोदरू बोलिला । तंव पांचाळाचा बंदि जनु आला
तेणें प्रतापु वाणिला । पुत्रां सहितु ।। २५८

म्हणे भो रायां ! कुंभोदरा ! । भो निकुंभा महावीरा !
तुम्हीं लाविलासें भेदारा । त्रि-भुवनां सीं ।। २५९

हा तंवचि वर-प्रतापु । जंव नाही देखिला पांचाळ नृपु
जो दाटुगेयाचा बापु । भू-पाळां वरी ।। २६०

नरि जुंझावेया कारणें । तुम्हां पाचारिलेसें तेणें
ना तरि शरणु येणें । पुत्र कलत्रेन सीं ।। २६१

ययां बोला तंवकैलें । सिहासनीं उभेंचि ठेलें
तंव दलभंजनें विणविलें । कर जोडौनियां ।। २६२

म्हणें मज डोंबला दलभंजनां असतां । तुम्हां उठणें न लगे सर्वथा
बांधौनि आणैन लोथां । पांचाळ सैन्याचियां ।। २६३

जी ! बांधौनियां मुचकें । पांचाळ तगराचें भातुकें
तुम्हां लागी आणीनु कौतुकें । पुत्रां सहितु ।। २६४

मग तोखौनि तेयां बोलीं । दोघीं उचितालंकारें दीन्हलीं
तंव चतुरंग सैना सिद्ध जालीं । उठावलीं कैसी ? ।। २६५

दाहां अर्बुजें वारू पालाणिलें । आठ अर्बुजें रथु घडाडिलें
दाहा कोडीं गज निगालें । किंकाळियां देतु ।। २६६

खदखदा प्रलय भैऱ्वु हांसतीं । तेवींचि वारू हिंसकारू करीतीं
सत्रानें हाकां देतीं । मोगरु पायांचें ।। २६७

होमकुंडीं घालितां पूर्णाहुती । जैसें अग्नीचें भडकु नीनीतीं
तेंवि नगर महाद्वारां नीगतां दीसेति । चातुरंगें ।। २६८

नगरा खालौतां च्यारिसहस्र दंड । अंतरें रणस्थंभुसे प्रचंड
तेथ डोंबल आला जो काळ-दंड । यम-दूत जैसा ।। २६९

पांचाळा चे धाकुटें दोनी कुमरें । राजदेओ तेजदेओ महावीरें
तें निजसैन्येंनसीं जुंझारें । उठावलें समरंगणीं ।। २७०

कुंजरू लोटिलें कुंजरां वरीं । राऊत उठिलें राउतां वरीं
पाय दळ घसरिलें पाय दळां वरीं । रथें सीं रथु ।। २७१

शिलिमुखीं दाटिलें अंबरु । दोंनि सैन्या माजी पडिला अंधःकारू
तेंथ न ओळखेंति आप पर नरूं । हातैवा खड्गांचा ।। २७२

असों हे तै दोंनि कुमरीं । श्रीदत्तस्मरणें तिखटां शरीं
दळवै वधिला महा वीरीं । डोंबलु देखा ।। २७३

तै डोंबला चे शिर उसळलें । ते क्रोशा एका जाओनि पडिलें
तेथ गव्हानु वशीनिले । डोंबले नावें ।। २७४

रणखांबाहौनि उत्तर दिशेसीं । मारु दीधला राक्षेसां सीं
शिरांचां सडा पडिला भूमीसीं । शिरपुर वसे तेथें ।। २७५

जेथें कां रणखांबु रोंविला । तेथ खांबगाओ असें वसविला
असों हें वीरें वीरू मारिला । पांचाळ कुमरीं ।। २७६

रथ गज वारूं सांडविलें । तें कीर्त्ती-पात्रां सी दीधलें
रायां जोहारौनि उभें ठेलें । कर जोडौनियां ।। २७७

राअें हर्षीं आलंगिलें । उचीतु वस्त्रालंकारेंनसीं पूजिलें
गज वारूं देऔनि संतोषविलें । भाटें बंदीजनु ।। २७८

असों हें एकीकडें अवधारा । वार्तिकांरी जाणविलें रायां कुंभोदरां
जी सैन्यें सीं दळवै नेला काळ-नगरां ।
पादचारी एकुहीं उरेंचिना ।। २७९

दोंघै धाकुटें कुमरू । तयांचां एव्हढां बडिवारू
वडीला पुत्रेनसीं नृपवरू । ठाईंची असें ॥ २८०
ऐसें आईकौनि प्रज्वळलें । जैसें वडवानळू चेतविलें
ज्वालां चे कल्लोळ निगालें । नेत्री हौनि ॥ २८१
क्रोधें बोलति निकुंभ कुंभोदरू । आमुचें तंव वज्र शरीरू
आमसी परावा वीरू । पुरेचिना ॥ २८२
घाओं देवविला निशानां उभय बंधु चालिलें आपण
तें सांघैनु सैन्य गणना । मुनी कृष्णया कविंडिभू ॥ २८३
हा पांचवा प्रसंगु संपला । पांचाळु राक्षसां वरीं आला
दोंघीं कुमरी दलभंजनु वधिला । कुंभोदराचा ॥ २८४

इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराटदेशोपनामालंकृत-मयकराजशिष्यकृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ-प्रकाश ग्रथे दलभंजन वधोनाम पांचमो प्रसंगः ॥५॥

---

६

## शतसंवत्सर युद्ध

श्रीपरमात्मने नमः

क्षीरसागर मथनीं अचाट । जैसें बुडबुडें नीगेंति एक दाट
तैसें पायदळ थाट । निगालें तीसार्बुजें ॥ २८५
जैसीं सूर्यावरी बाळें । कालरात्रीं चालिली तम सैन्य मेळें
तैसें गज-भारूं चालिलें । अकरां कोडीं ॥ २८६
मृत्युलोकांवरी घालावेयां घालणें ।
जैसीं निगांली काळाची विमानें
रथ चालिलें पाडे तेणें । पंधरां अर्बुजें ॥ २८७

रणतुरें वाजति भयानकें । अग्निमंत्राचे ऊठिति तडकें
तेथ निशानाचे धडकें । वाजतां आकाश गर्जे ।। २८८

दळ चालिलें दनदणां । रण भूमीं आलें तत्क्षणां
वीरूं करितांति गर्जना । घेतांति पैजा ।। २८९

एक वरदीं सेवका चा । दुसरा वरदीं स्वामि चा
संग्रामु मांडिला दोघांचां । तुंबळु देखा ।। २९०

सेवकाचा वरसिद्धीं नेणें । आपुला तरि सत्यचि करणें
म्हणौनि पुढां विदानें । मांडिली कैसीं ।। २९१

जुंझांचें सांघों लय लाघव । साहित्यालंकारें दावीनु ओडव
परि ग्रंथ वाढैल सपल्लव । आवरेना ।। २९२

पांचाळ महायोद्धा रण-रंगीं । वरि श्रीदत्त वरदानाची वज्रांगी
म्हणौनि युद्धीं तो अभंगी । होऊनि जुंझतुसें ।। २९३

कुंभोदर आणि निकुंभ वज्र शरीरीं । तोचि लाठु तेयांचा अंतरीं
तेणें निःशंक पणें जुंझारी । घेतुसें परदळेंसी ।। २९४

ब्रह्मराक्षसें महाबळें । कैसें उठावलें सैन्यमेळें
मिळालीं दोनि दळें। सिंहनादें गर्जतु ।। २९५

आंढाउवां आंढाऊं निहटलें । राउतां वरी राऊतें उठावलें
गजांवरीं गजें लोटिलें । न संवरतां ।। २९६

रथेंनसी रथें दाटितीं । मकर तोंडा मकर तोंडें आदळेंति
पायांचे हाणेंति । गज वारु वांसीं ।। २९७

राक्षसा दळवै रण-पिंगळ । उठावैला करीतुं जागबोळ
कीं तों खवळैला काळ । ग्रासावेयां जैसा ।। २९८

घ्यारे घ्या ना कां म्हणतु । वळां रे वळां हे राऊतु
पैल पादचारीं पळतु । जाओ नेदा पां ।। २९९

पांचाळाचा दळवै रण-दीवा । जुंझतुसें मोटिया वांठिवा
परि रणपिंगळाचा यावा । न सहावेंचीं ।। ३००
कैसा रणपिंगळु निधडा । पायदळांचा केला सडा
एकेची घाअें राऊत घोडा । पाडितु असें ।। ३०१
रणदीवा न साहेचीं निहटी । सैन्यां थोरजालीं आटा आटीं
ते देखौनि दृष्टीं । खवळलें पांचाळ पुत्रें ।। ३०२
राजाळ आणि तेजाळु उठावलें । रणपिंगळातें पाचारिलें
बरवें नाव केलें । राक्षसां पुढें ।। ३०३
आतां ह्मणी जासी राहे । तुज वांठीवु थोरु आहे
आपुली करणी पाहे । दावि मातें ।। ३०४
म्हणौनि गुणीं लाविलें बाणु । लक्षौणि केलें शर संधानु
तें तोडिलें ततक्षणु । पिंगळे तेणें ।। ३०५
देखौनि तोषलें राजाळ तेजाळ । म्हणेति भलारेभला धनोर्धर कुशल
बरवेंची युध्य मूळ । जाणे सी तूं ।। ३०६
मग सोडिलें शर जाळ । बाणीं व्यापिलें अंतराळ
लोपिलें सूर्य मंडळ । पडैला अंधकारू ।। ३०७
राक्षसें जालें कासाविसा । रणपिंगळु देतुसें धिंवसा
बाप ! धनोर्धरू कैसा । तोडिलें शरजाळ ।। ३०८
मग आपणु विद्यां-प्रौढीं । संधान करौनि बाण सोडीं
तें पसरिलें लक्षें-कोडीं । मारितु सैन्यातें ।। ३०९
स्मरौनि विद्या महेश्वरीं । ते संधानु तोडिलें राजकुमरीं
मग अमितां बाणीं अनिवारी । हाणीतिलां तेहीं ।। ३१०
तें बाणें अ-निवारूं । तोडौनि सारथी वारूं रव्हरूं
बाण लागलें खडतरूं । मूर्छागतु पडिला धरणीं वरीं ।। ३११

सारथिअें दूजा रथीं घातिला । आणी झटती रथू पळविला
येणें सैन्यें भंगु जाला । तिए वेळीं ॥ ३१२
सैन्यां भंवतुसें आटु । तें देखौनि कुंभोदरु सुभटु
घोडेयां देववीला साटु । सारथिआं करवीं ॥ ३१३
अमीतें शरजाळें सोडिलें । तेणें पांचाळसैन्यु खोंचिलें
महावीरु वीरघाईं उचलिलें । राजाळ तेजाळ तें ॥ ३१४
तंव देखोनि अनिवारू । उठावलें आप्त विज्ञानेश्वरू
घडघडिलें रहंवरूं । प्रलये मेघु जैसें ॥ ३१५
साति कोडीं रहंवरां । तीनि कोडीं कुंजरा
आठ कोडीं असिवारां । पादचारीं अकरां कोडीं ॥ ३१६
सिंहनादें गर्जीनिलें । कुंभोदरातें पाचारिलें
साहे साहे रे म्हणितिलें । महावीरीं ! ॥ ३१७
आइकौनि कुंभोदरु ओसरला । निज सैन्येंनिशी परतैला
तेव्हेंळीं अति संग्रामु मांडिला । एरु एरांसीं ॥ ३१८
जाली रथांसीं रथु निहटी । थडकां घेतिलियां गजघंटीं
घसरेंचि वीरां पडली गाठीं । परस्परेंसीं ॥ ३१९
बाणें बाणु निवारिती । घाअेनी घाओं टाळिती
निर्वाण प्रौढिअें जुंझेति । महावीरू तै । ३२०
समरंगणीं जुंझिता महावीरां । पाओ न घलितींचि माघारा
वेंचितांती शरीरां । स्वामि काजां ॥ ३२१
घड घडीतु रथ-वारू । शस्त्रांचे घाये वाजेति अपारूं
आंगिचे रुधिरूं एकसरूं । तडकौनि फूटें ॥ ३२२
शौर्याग्नी प्रज्वलला वीरांतरीं । नेत्रें झांकौळिलें आवेशधरी
तेथ न दिसें तंवक आंधारीं । आपुलां परावां ॥ ३२३

आवेशें भीडतीं दोनि दळें । तोडींति गजांचीं कुंभस्थळें
पाडितांती करवळें । वारुवांचीं ॥ ३२४

आवेषौनि पदाति घेंति उडियां । उभें राहौनि मकरतोंडा वैन्हियां
निवटौनि सारथियां । सिंहु नादें गर्जतीं ॥ ३२५

राउतां राऊतें हाकितीं । एकमेकातें नोंकिती
वर्मस्थलें हाणितांतीं । लक्षौणियां ॥ ३२६

रण तुरांचेनि गजरें । कानीं न पडेंति उत्तरें
तेथ ओष्टाचेनि अनुकारें । परिसतीं शब्दांतें ॥ ३२७

प्रतिशब्दांचेनि नोकें । वीर क्रोधां चढती तंवकें
वाठीवु दावितीं अधिकां अधिकें । एकमेके सीं ॥ ३२८

लागैलीं रणतुरें विराणें । भाटें वाणितीं शस्त्राणें
तेणें अधिकांची भरती फुराणें । वीरां आंगीं ॥ ३२९

वीरें जुंझेंति महा प्रौढी । भवंडौनी गदा लहुडी
हाणौनी करीति चेंदाडीं । घोडेंयां राउतां चीं ॥ ३३०

मारां पेटिलें वीरू गाढें । शिशाळांचें जालें सडें
तें लोंबतांति चहूं कडें । धडां धडें लोळतांतीं ॥ ३३१

गजांचियां सोंडां तोडितीं । तेवांची कुंभस्थळें विदारितीं
खुरपुटें हाणीतीं । वारूवांचीं ॥ ३३२

बाणें बाण आटिलें । हांतिएरें हांतिएरू मोंडिलें
शौर्य्यें पाद तळां आलें । झालीं झोंटधरणीं ॥ ३३३

बळियें धरौनि निबळियां । हाणेंति गुढगें कोपर-खिळियां
कळां लावींति गळियां । प्राण घेंति ॥ ३३४

तेथें जालें रण-तुंबळ । एरु एरां चें आटिलें दळ
तंव बाहतांति खळाळ । रुधिराचे ॥ ३३५

पांचाळ पुत्रीं बाण कुंदळें । उखळौनि महारथियांचें खिळें
कुंभोदरा तें दृष्टीं सूदलें । हाकिला तेथ ।। ३३६

कुंभोदर आणि निकुंभु खवळेलें । दोंनि हीं रथें प्रेरिलें
मग सत्रानें उठावलें । सांघौ कैसें ? ।। ३३७

बुडवावेयां भू-तळ । जैसा कां लोटें समुद्र प्रलय जल
कीं जाळांवेयां ब्रह्मांड-गोळ । वडवाग्नी जेवीं ।। ३३८

घातिलें अनिवार बाण । तें पांचाळीं तोडिलें संधान
मग शस्त्रास्त्रीं दारुण । पेटिलें संग्रामां ।। ३३९

विज्ञानेश्वर आणि आप्त । हें कुंभोदरेसीं जुंझित
राजाळ आणी तेजाळु भीडत । निकुंभेसी ।। ३४०

वर्म्म शब्दीं पाचारितीं । एकमेकां चापितीं
पुनती निर्वाणें हाणेंती । येरु एरां ।। ३४१

न लोटेति कव्हणीं कव्हणां । दीसु गेलां अस्तमानां
मग ओसरतियां सैना । गेलियां मेलिकारां ।। ३४२

उदयांची आन्हीकु आरोगणा । सारौनि पांचाळ राणा
पाठवितां जाला बंदी जनां । कुंभोदरासीं ।। ३४३

तो पढीनला ब्रीदावली । भो कुंभोदर आणि निकुंभु महाबळीं ?
तें सिंह नादें ऊठिलें तिए वेळीं । निगालें निश्चयें ।। ३४४

निकुंभा आणि कुंभोदरा । पैल पांचाळु नृपवरां
युद्ध होत महावीरा । निकरें देखा ।। ३४५

तंणें राक्षसे महाबळें । बाणें विंधिलें वर्मीं कुंभस्थळें
लागतांती जैसीं सोंलिली सरकाळें। श्रीदत्तनामु सुरियां ।। ३४६

पांचाळे महा पराक्रमें । लक्षौणि भेदिलीं तयांचीं वर्मे
उळौनि जाती आलेंनी क्रमें । माघारां पडती ।। ३४७

कीं तेयांचा शर वज्रलोही । पांचाळ बाणांचा धनीं पाहीं
हाणितां अंबरु दाटे नेहीं । लोहां आटि जाली ।। ३४८

दोघेंहीं अभंगु अतिरथीं योद्धार । संग्रामु करीति रणधीर
एकाचें वज्र शरीर । एका वरद श्रीदत्ताचें ।। ३४९

उदयो होतां सूर्याचा । आरंभु होअे युद्धाचा
काळ मांडिलियां अस्ताचा । ओसरतीं माघारें ।। ३५०

दोघे पराक्रमी महावीर । जुंझितां क्रमलें शत-संवत्सर
युध्य होतसें घोरांदर । परि न लोटति एरु एरां ।। ३५१

ऐसें अजीतु देखौनी । राओ पडिला चिंतावणीं
पुढां कांई वर्तलें तें कृष्णमुनी । सांघैलु कवी-डिंभु ।। ३५२

साहावां प्रसंगु जाला अवधारा । संग्रामु करितां दोघां वीरां
क्रमीनिलें शत-संवत्सरा । पुढां नवल वर्त्तैल ।। ३५३

इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराटदेशोपनामालंकृत-
मयंकराजशिष्यकृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ-प्रकाश
ग्रंथे शतसंवत्सरयुद्ध वर्णनोनाम षष्टमो प्रसंगः ।। ६ ।।

---

७

## भूतगण सहाय

श्रीपरमात्मने नमः

युद्ध करितां पांचाळ श्रमला । निशी चिंताक्रांतु बैसिला
मग पुत्रांप्रतीं बोलतां जाला । चौघां हीं जनां ।। ३५४

हें वज्रशरीरीं दोघें जनु । यांसीं होतां न दिसे मरणु
आतां उपाय तो कवणु । करावा एथ ? ।। ३५५

तंव पुत्रें म्हणतीं राया ! । आतां स्मरावे श्रीदत्तात्रेयां
आम्हां भरंवसां तेथांचेयां । वरदाणाचा । ३५६

तेयांचेनीची वरदानें । आम्हीं जीवीतु असों प्राणें
एऱ्हवीं यांसी जुंझितां कवणें । उरौ सकें ? ॥ ३५७

ऐसां संवादु करौनी । पिता पुत्रु बैसिलें ध्यानीं
तंव तियें समैं नारदमुनी । पातला तेथें ॥ ३५८

जैसा एकाधा वणवेयां सांपडें । निगावा न दिसें कव्हणीं कडे
तंव अवचितें वर्षें मेहूं फुडे । भाग्योदयां ॥ ३५९

तेंवि रायां पडतां चिंतार्णवीं । तेव्हेंळी स्मरतां कुलगोसावी
हातु देयांवेयां दत्तात्रय देवी । धाडिला नारदू ॥ ३६०

दर्शतां निवाले अंतर थोर । केला साष्टांगीं नमस्कार
पूजा वंदन करौनि समाचार । सांगीतिला नारदां ॥ ३६१

तंब नारदु म्हणें गा राया ! । तुआं आराधावें हिरण्यगर्भु ब्रह्मयां
तो यां मरणाचेयां उपाया । सांघैलु सत्य ॥ ३६२

हिरण्यगर्भीं आराधना । उपदेशिलीं राजवर्धना
मग नारदऋषी आपणा । मार्गी जातां जाला ॥ ३६३

तंव रायें पुत्रासी युद्धीं योजिलें । आपण एकांतु केलें
अति उत्कंठे अभ्यर्थिले । हिरण्यगर्भासीं ॥ ३६४

तेथ प्रकटु होऔनि ब्रह्मां । प्रसंन जालो म्हणें भो राजोत्तमा ?
तूं कांईं मागतोसी आम्हां । माग वेगीं ॥ ३६५

तंव राओ म्हणे ब्रह्मेयांसीं । कुंभोदर आणि निकुंभ ब्रह्मराक्षसीं
प्रसंन करोनी महेशांसीं । जालें वज्रदेहीं ॥ ३६६

तेहीं परावर मार्गांचा मोडिला धडा । तिहीं लोकींचा केला रगडा
तरि तेयां वधावेयां वेगाडा । उपाओ सांगिजे ॥ ३६७

हिरण्यगर्भी म्हणितिलें राजन्मौळी ! । सुरळ भैरव सत्यादेवि बाळी
यांते आराधिलेयां तात्काळीं । कार्य होईल । ३६८

मग तेयांचे मंत्रोपदेशौनी । हिरण्य गेला अदृश्य होऔनीं
नगर वसताअे तिअें स्थानी । हिरण्यपुरी ।। ३६९

असितासी देवल सांगे । सुरळ आराधिलेया वेगें
तो प्रसंनु जालेया मागे । वरदान रायें ।। ३७०

राओ म्हणे तूं प्रसंनु जालासी । तरि कुंभोदरा निकुंभासीं
वधावेयां वेगेंसी । सांघिजे उपाओ ।। ३७१

तंव बोलिलें भैरवसूळें । मी राहीनु तुझियां बाणांचें फळें
युद्धकाळें वीण रात्री बळें । प्रेरावा बाणु ।। ३७२

तेणेंची बाण घातें । तें पावतीं मृत्यांतें
तूं वेगें आराधी सत्या देवीते । अशुद्ध ग्रासावेयां ।। ३७३

ऐसां सुरळ भैरवु बोलिला । बाण फळें होऔनी राहिला
देवल म्हणे तेथे वसीनिला । सुरळग्रामु ।। ३७४

मग मंत्र जपु हवनु । सत्यादेवी लागीं उपासनु
तै देवी प्रकटौनि वरदानु । सन्मुखीनिली ।। ३७५

प्रसंन जाली म्हणे रायांसीं । राओ म्हणे तूं प्रसंन जालीसीं
तरि ब्रह्म राक्षसु वधावेयांसी । सहाए होआवें ।। ३७६

तंव सत्यादेवीं म्हणें । तुआं युद्ध काळें वीणु भैरव बाणें
तेयांचां वधु करावा निर्वाणें । रात्री समअें ।। ३७७

ते वरदी महेश धर्मी । जरि तेयांचें अशुद्ध पडे भूमीं
तरि तें मागौते ऊठति पराक्रमीं । तें नावरिती कव्हणांसीं ।। ३७८

ते अशुद्ध ग्रासावेया । मी येतुसें भूतावळीं घेऔनियां
परि तूं आराधी माझियां । दोघां पुत्रांसीं ।। ३७९

वडिला नांव रोकट । धाकटेयां नांवे कट
तें दोघें येति बळकट । भूत सैन्येंसीं ।। ३८०
तें मारींति राक्षसु दळांसीं । परि तुआं आव्हानावें महारुद्रासीं
करावेयां तुमचें पूर्व वरांसीं । उपाओ संहरणु ।। ३८१
तेयां तीघांचां मंत्रोपदेशौनी । आपण राहिलीं अदृश्यु होऔनी
ग्रामु वसीनिला नियेंस्थानीं । सत्यापुर ।। ३८२
मग राअें महारुद्रु प्रार्थिला । तो पंचमूर्तीसीं प्रकटु जाला
राओ विणवी महारुद्राला । कर जोडौनियां ।। ३८३
म्हणें तुमचेनि वरद बळें । राक्षसें कुंठिलें देवधर्मु सकळें
तरि आपुलें द्यावें सामर्थ्य बळ । तेयांचां संहार करावेयां ।। ३८४
तरि मज देआवें वरदान । तेयांचें होआवेयां उछेदन
या वरी पंचमूर्ती रुद्र आपण । बोलता जाला ।। ३८५
म्हणें बा पांचाळ चक्रवर्ती । तुझेंनि हातें तें मृत्यु पावतीं
देव धर्मे नांदिती । तुझेंनि यशें ।। ३८६
ऐसां वरूं देऔनियां । पंचमूर्ति अदृश्यु जालियां
देवल म्हणे पंच देवलिया । तीर्थ जालें ।। ३८७
मग रायें अभ्यर्थिलें । रोकडा आणी कडा प्रकटेलें
तेथें दोंनि ग्रामु वसीनिलें । रोकडा आणी कडा ।। ३८८
तें राकट-कटु महा बळीं । तेहीं पांचारीलियां आऊठ कोडीं भूतांवळीं
कां दीस आलें बहुतां काळी । पारणेयांचें ।। ३८९
पांचारिलें रोकडां कडीं । आलें भूत-गण नायकवडीं
तेयांचीं नांवें परवड़ीं । सांगैनु मीं ।। ३९०
चित्र विचित्र हुडन । हंस भृंगी मल्लमर्दन
सागरू पीठ भीषण । कुंभजातु ।। ३९१

विभ्रमु वरिवाहक । सूचीकवळ रजक
महाभुज महामेघ उचंक । भूतनाथु ।। ३९२
केवळ-कलि सिंहनादीं । सुग्रीव मर्कटु महानादीं
कुमार खेचर वंचक भेदीं । महामारी कटोत्कचु ।। ३९३
कपोतु बटूका दीर्घ-लिंगी । नृसिंहो वृकोदरू महापिंढगी
मातांगु ऊंचमतित्यागी । निशाचरु बलाधिक ।। ३९४
ज्वालाक्ष लोळक एवमेव । विटिलिंगी पोतक भव
सिद्धकार सित शंकू तंव । घुघुत योगिनीं पुत्रें ।। ३९५
क्षोभक विषग्राही जलशये । मृगारोह मणिभद्र रसुप्रिये
कोंकीळ कुंभवर्णी अद्रिग हासये । भूपाळ-कंटकू ।। ३९६
चितावह घटकर्ण । सुपथ प्रेरण कुंडन
क्षेत्री कंचुकी दर्पमान । गण नायक ।। ३९७
नाअेश्वर पाणेश्वर । पापविनाशक-रामेश्वर
संगमालय नंदिकेश्वर । विकट नेत्रीं ।। २९८
मैराळु अनिलेश्वर । सिद्धनाथ खंडेराओ कोलेश्वर
वंकनाठ केदारेश्वर । पंचलिगीं ।। ३९९
ऐसें भूतगण नायक आले । सत्यादेवीं कुमरांतें जोहारिलें
सवेंची दळभारेंसीं निगालें । तयां सवें ।। ४००
आतां सत्यादेवीचा उठावा । सवें चालें यक्षणींचा मेळांवां
तयांचयां नांमाचा आइकावा । अनुक्रमें ।। ४०१
विचित्रा विभ्रमा हंसिनी । जनरंजिका विशाला भीषीणी
मदना घटां काळवर्णीं । महाभया ।। ४०२
महेंद्रा शंखिनी चंडी श्मशांनी । वैष्णवी कळा मेखळा लक्ष्मी वटक्षणी
शतपत्रिका सुलोचनां माणिनी । सुशोभिनी कपाली ।। ४०३

नटी कामेश्वरी विलासिनी । सुवर्णरेषां वरसेंदुरा रागिनी
मनोहरा प्रमोदा पद्मिनी । नखकेशिका ।। ४०४
सुवर्णवती रत्नीप्रिया भामिनी । एकवीरा जोगेश्वरी भवानी
जोगादेवी चौढाळिनी । आलियां निजमेळेंसीं ।। ४०५
किंकाळियां नादें गर्जंतीं । करीं रुधिरपात्रें झेलितीं
हर्षे गोंदळी नाचतीं । सत्यादेवी पुढां ।। ४०६
असों हे तेयां नृप-नाथां । कुंभोदर निकुंभाचेयां घातां
आराधना करितां । लोटिला संवत्सरू ।। ४०७
वश्य करौनी सकल भूतगणां । जाऔनि भेटिला चौघां नंदना
तेयां दीधलें आश्वासना । राजनीती ।। ४०८
मागील वृत्तांतु सांघीतिला । देवतां भूत-गणु वश्यजाला
वधाचां समयो आला । कुंभोदराचा । ४०९
पिता पुत्रां क्षेमें भेटिजाली । संतोषें रात्रीं क्रमीनिली
पाहालेयां स्नान संध्या वंदनें सारिली । जालीं देवतांर्चनें ।। ४१०
रायां कुमारां जालीं आरोगणा । घांओ देववीला निशाना
कुंभोदरां जाणावेयां बंदीजनां । पाठविलें पुढां ।। ४११
बंदी जनीं पढौनि आशिसी । कितीं वाणौनि म्हणतिले तयांसी
बोलाविलेंसें संग्रामासीं । पांचाळें ।। ४१२
तंव राक्षसु बोलति तवकें । संग्रामु तंव आमुचें भातुकें
पांचाळु बोलिजे केतुकें । आम्हां पुढां ।। ४१३
आमुचेयां बाणांचा दरारा । न साहवेंची पांचाळ नृपवरा
युधीं घालौनियां कुमरां । पळाला आजिवेऱ्हीं ।। ४१४
आतां पुनती जरी आला । तरि पुरुषार्थु जाणवैल भला
म्हणौनि घाओ देववीला । निशानांसीं ।। ४१५

रणदीक्षा घेऔनि वीर । संग्रामा निगालें निकुंभ कुंभोदर
प्रतापें आलें वेगवत्तर । रणभूमिसीं ।। ४१६

तंव रणस्छंभु घालौनि पाठीसीं । पांचाळ उभा निज सैन्येंसीं
तंव दृष्टीं जालीं एरु एरांसीं । दीधला सिंहनादु ।। ४१७

आंदोळ जाला दोंनि दळां । पृथिवी बुडों पाहे आवर्णें जलां
तंव होतांती कुलांचला । कंपायमानु ।। ४१८

परस्परें घालितां बाण-जाळ । मेरूं आड जाओंपाहे रवि-मंडळ
म्हणे झणीं बाण येंति सबळ । तोडीति रथातें ।। ४१९

दिग्पालें स्थानें डळ-मळिली । अमृत-कुंडें उलंडिलीं
तिअें पाताळीं जाऔनि पडिलीं । अद्याप वेन्हीं ।। ४२०

असो हें युद्ध मांडिलें तुंबळ । परस्परें बोलती सळ
निर्वाण घाओ देति सबळ । हाणतीं वर्म पीठीं ।। ४२१

बाणांसि बाणें आदळेतीं । रणरंगीं तिडकियां पडितीं
वीरांचीं आंगें पोंळतीं । न लेखतीं विरश्रियें ।। ४२२

खड्ग वायोचेनि घुघुवाटें । वीर पादप शिरांचीं पाणरटें
तुटौनि पडितीं एकदटें । रण-भूमीसीं ।। ४२३

वीरू मेघ वर्षतीं शोणित-जलें । महापूरुं चालिलें रण-मंडळें
पाहविलीं पायदळें । एरएरांचीं ।। ४२४

असों हे निकुंभ कुंभोदरा । आणि पांचाळु नृपवरा
निकरें महावीरां । मांडिले युद्ध ।। ४२५

निर्वाणींचीं शस्त्रांस्त्रें । एकमेका वरी घालितों विचित्रें
तोडिती न लगतां क्षणमात्रें । एरुं एरांचीं ।। ३२६

कुंभोदरें म्हणितिलें पांचाळा ! । बरवी जाणैसीं युद्ध-कळा
माजी पृथिवीचियां भू-पाळां । जुंझारुं होशी ।। ४२७

भू-मंडळींचें भू-पाळ । आमसीं जुंझीनिलें सकळ
परि न लगतां वेळ । पराभविलें तें ।। ४२८
तें सेवकु करौनि स्थापिलें । देओ शरणागतु केलें
दाए तें घेतिलें । सप्त पाताळींचें ।। ४२९
युद्धं करी आमुसीं । ऐसा कव्हणीं नाहीं धरेंसीं
तुझियां भुजबलांसी । मानवलो आम्हीं ।। ४३०
तू भेटिलांसीं महावीरू । युध्ये केलें शत-संवत्सरू
आइनी पुर्विलीं थोरू । आमुचेयां भुजांचीं ।। ४३१
परि एकची केलें कुडें । लेंकुरुवें घालौनि वैरियां पुढें
गेलासीं तोंड-करौनि कानवडें । वर्ष एकु ।। ४३२
तेणें आमुचा आवेशु गेला भावें । लेंकुरुवांतें संग्रामीं कैसें मारावें?
धाकुटेयांतें खेळवावें । खेळतीं तैसीं ।। ४३३
अंत:पुरांसीं मिळौनी । देहां इंद्रियां सुख देऔनी
मागौतां आलासीं समरंगणीं । जुंझावेयांसीं ।। ४३४
तंव पांचाळे म्हणितिलें कुंभोदरा ! । भेदावेयां तुमचेया वज्रशरीरा
भैरव सत्यादेवी ईश्वरां । आराधिलें वर्ष एकु ।। ४३५
तेहीं होऔनी प्रसन्न । मज दीधलेसें वरदान
तेणें वरदें अधुना घेईन प्राण । तुम्हां दोघांचा ।। ४३६
आतां सावधानु होआवें । आपणेयांतें वांचवावें
जो मज वर दीधला दत्तात्रेय देवें । तो साचु करैण ।। ४३७
तंव कुंभोदरें म्हणितिले पांचाळा ! । बहू जल्पसी वाचाळा
जंव पडला नाहींसीं वडवानळा । बाणां माजी ।। ४३८
आतां स्मरैरे आपुलें कुल-दैवतु । गुणीं बाणु लाविलें धुम्रकेतु
तंव धुम्र दाटला कटकांतु । पांचाळाचेयां ।। ४३९

तेणें धुम्रे करौनियां । वीराचियां दृष्टीं झांकौळिलिया
तेणें गळतीं आश्रुचियां गळतियां । हृदय लिंगावरी ।। ४४०
अघवां नेत्र झांकिलें वस्त्रीं । ओकारियां देतीं वक्त्री
आओ सांडिला क्षेत्रीं । हातौनि गळतीं शस्त्रें ।। ४४१
सवेंची पुलस्त्य-कुमरें कांईं केलें । वडवानळ शस्त्रां स्मरिलें
गुणीं बाण लाऔनी प्रेरिलें । पांचाळ सैन्यां वरी ।। ४४२
वडवानळाचा धडका । एकसरां उठिला माजी कटकां
तेणें जळतुसें आइकां । चतुरंग सैन्यु ।। ४४३
वीरूं आपणपें न विचारितीं । एकमेकांचेयां गळां झोंबेती
काकुलतिअें रीगौ पांतीं । उदरीं कुंभिनीचा ।। ४४४
सैन्यीं भवंतुसें आट । तंव पांचाळ राओ सु-भट
हृदईं धरोनियां नेट । चिंती सोमशस्त्रां ।। ४४५
तेणें अमृत उसळलें पाताळौनी । पृथिवी फोडौनि पसरलें रंगणी
मग पांचाळ सैन्यांवरीं वर्षौनी । शांत केला वडवानळु ।। ४४६
जेथौनि निगालें अमृत । तेथ जालें सोम-नाथ
देवल सांगे असित । ऋषी प्रतीं ।। ४४७
मृत्यें जालीं जीवंतें । असावधें जालीं सावचीत्तें
विकळीं सांडौनी विकळांतें । युध्यें प्रवर्त्तलीं ।। ४४८
ऐसें देखौनि ऋषी कुमर । माणशीं विस्मीतु जालें थोर
म्हणती धन्य पांचाळ-वीर । अजीतु हा ।। ४४९
तंव पांचाळें कांईं केलें । झंझावातु शस्त्रां मोकलिलें
तेणें सैन्यु उडालें । ब्रह्म-राक्षसाचें ।। ४५०
राऊतें पायदळें ऊडेतिं । गजु रथें आकाशां जाती
येऔनि भूमीं आदळतीं । चूर्ण होतीं शरीरें ।। ४५१

तंव कुंभोदर आणी निकुंभ वीरे । जपीनलें नगास्त्रु वेगवत्तरें
तेणें झरतीं जालीं स्छीरें । झंझा वातु ॥ ४५२

ऐसें कडों वीकडीं अवधारा । जुंझितां तेयां महावीरां
तंव प्रवेशकेलां दिनकरां । अस्ताचलासीं ॥ ४५३

ओसरलियां दोंनि सेना । राक्षसु गेलें निज भुवनां
मैल्यकारां गेला पांचाळु राणा । निजसैन्येंसीं ॥ ४५४

संतां विणवी कवि-डिंभु कृष्णमुनी । युद्ध कुंठिलें एथौनी
पांचाळु वधैल राक्षसु दोनी । भैरव बाणें ॥ ४५५

श्रीदत्त वरदानें बळाविला । पांचाळु सायासीं पडिला
भूतगणु साहाई केला । सातवां प्रसंगीं ॥ ४५६

इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराटदेशोपनामालंकृत-
मयंकराजशिष्यकृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ-प्रकाश
ग्रंथे भूतगण साहाय वर्णनोनाम सप्तम प्रसंगः ॥ ७ ॥

---

## ८

## ब्रह्मराक्षस वध

श्रीपरमात्मने नमः

येयां नंतरें प्रवर्तेलीं निशीं । तंव रोकडा आणी कडा भूतांनिशीं
सत्यादेवीं योगिनी चक्रासीं । आली रायां जवळीं ॥ ४५७

म्हणती राया ! वेगु करावा । भंवतां नगरूं गिवसांवा
भैरवु बाणीं प्रेरावा । वध करावा राक्षसांचा ॥ ४५८

एरी कडें कुंभोदरु निकुंभु दोनि । बैसोनि आपुला सिंहासनीं
विस्मयो भरौनी मनीं । सांगती गोष्टीं ॥ ४५९

त्रिभवनु जिंतिलें आम्हीं । कव्हणी पुरला नाहीं संग्रामीं
परि थोरु देखिला पराक्रमी । पांचाळु हा ।। ४६०
एकोत्तरशत संवत्सरू । युद्ध करिताअें धुरंधरू
ऐसा कव्हणीं योद्धारू । देखिजे ना ।। ४६१
आमुचें निर्मोघ बाण । एणें लेखिलें तृणां समान
आतां उपाअें कवण । करावा यांसीं ।। ४६२
परि ऐसें वाटतसें मनां । आम्हीं पीडा दिलीं त्री-भुवनां
तेणें क्रोधु आला कां नारायणा । रचिलें विघ्णु हें ।। ४६३
आयुष्याचा पुरला अंतु । ऐसा दिसताअें संकेतु
तरि मागौतां एकें वेळें प्रार्थू । अष्टमूर्तीसीं ।। ४६४
तें वचनु माणिलें निकुंभा । कुंभोदरु ऊठिला यज्ञारंभा
तंव तडकु फूटला खांबा । सभामंडपाचेयां ।। ४६५
तो त्रिखंडौनि पडिला धरणीं । कुंभोदरू खोचैला मनीं
तंव निकुंभु बोलिला वचनीं । न होअें कार्यसिद्धी ।। ४६६
चिंता प्रवर्तैली तेयां वीरां । सभा आटोपौनि गेलें मंदिरां
भोजनां सारौनि विचारां । बैसलें एकांतीं ।। ४६७
इतके जंव वर्तैलें । तंव रात्रीचें यामु-द्वय लोटिलें
ऐसां समईं नगरू वेढिलें । पांचाळ राअें ।। ४६८
आऊठ कोडीं भूतांवळीं । नव कोडीं कात्यायनीचीं हाउली
पाडौनि नगर-पौळीं । केलें सपाटु ।। ४६९
नगरीं जाला हाहाकारू । तंव रोकडा-कडा पांचाळ वीरू
सत्यादेवीशीं प्रवेशलें मंदिरू । कुंभोदराचें ।। ४७०
नगरांतु होतसें कांईं । तें तेयां ठाउकेंचि नाहीं
विकळ पडिलें असतीं देहीं । चिंता करौनी ।। ४७१

दोघें बैसिलें असेति एकांतीं । जवळीं नाहीं जुंझाचीं आइती
तंव तेथें पांचाळु नृपती । कांईं करितां जाहला ।। ४७२
उभा ठाकौनि स्थंभां आडु । हातीं परजौनि कोदंडु
गुणीं लाविलासें प्रचंडु । भैरवुबाणां ।। ४७३
कानडी भरौनि सोडिला । बाणु कुंभोदरां कंठीं आदळैला
शिरू तोडौनि बैसीनिला । कंठी निकुंभाचां ।। ४७४
तेयांचा कंठनाळाहौनि । अशुद्धु जंव पडावें धरणीं
तंव धावीनिलियां जोगिनीं । सत्यादेवीचियां ।। ४७५
एकीं पात्रें भरींतीं । तंव आणिकीं पात्रें ओडवीतीं
घेआं घेआं म्हणौनि वाटितीं । एकमेकींसीं ।। ४७६
शिरें खातीं खसखसां । अशुद्धु ढोंसितीं ढसुढसां
मग काढौनि मेद मांसां । गोळें गिळींती ।। ४७७
कडा आणी रोकडा । तेहीं पुत्र-कलत्रांचा केला रगडा
राक्षसें भक्षिती तडतडां । वेळु न लगतां ।। ४७८
मग देऔनि आरोळीं । आवेशें धावेंति भूतावळीं
जाऔनि बैसिती कंठ-नाळी । घोटु घेंतिं अशुद्धाचें ।। ४७९
एकीं भयंकर शब्दां करीतीं । एकीं झिंजाळें पसरौनि धांवतीं
एकी डोळें वाटारितीं । कुंडालेयां एव्हढें ।। ४८०
धांऔनि धरीतीं राक्षसां । पिळौनी मोडितां घसां
पोट फाडौनि मेद मांसा । स्वानंदें भक्षिती ।। ४८१
एकें धरौनि पाईं । भवंडौनि आदळेंति भुई
ठिकरियां होतां पाहीं । हांसेंति खदखदा ।। ४८२
शोणितांचें पूर लोटिलें । देखौनि भूतगणु हरुषैलें
शिरें घेआनि खेळों लागैलें । परस्परेंसीं ।। ४८३

हातां पायांचीं कांडौरी । घेऔनि खेळतीं टिपरीं
मेद मांस गोळे वरी । हाणती एकमेकां ॥ ४८४
ऐसां संहारू केला । राक्षसु एकहीं नाहीं उरला
भूतां सुकाळु जाला । मेदमांसाचा ॥ ४८५
जोगिनीं मिळौनि समस्तां । सत्यादेवी बोलें हर्खितां
भूतगणु भुकैलें वो जुंझतां । करा रंधनें ॥ ४८६
राक्षस दळांचीं धान्यें । परवडीं निफजवां वो ! पक्कान्नें
लोणिअें तावा वो ! ओजनें । मांदयाची ॥ ४८७
परवडी करा पत्रशाखांचियां । पदांगुळीचीं खांड वडिया
पदतळांचियां पाटवडियां । ओजां रांधा पै ॥ ४८८
पोटरियांचीं चिरा दोडकीं । मांडियांचीं वृतांगें नेटकी
भोंपळीं खांडा नितंबाची । कवतिकें ॥ ४८९
उदरांचीं चीरा कोहुळीं । भुजलतांचीं सांबारा पडवळी
पदांगुष्टांचीं कारलीं । वरवीं रांधा ॥ ४९०
रसना कर्ण भाजियां । सांबारौनि रांधावियां
वपाचियां सेवळियां । एळाविआं तुम्हीं ॥ ४९१
मांडे करा हस्ति कर्णांचें वडें तळावें गज तळाचें
भात वेळां नरदंताचें । सुवासीकु जें ॥ ४९२
करांगुळीचिआं मालतिया । हृदयांचिआं गुळौरियां
अंत्रे काढौनि फेणिया । ओजवावियां ॥ ४९३
गज सोंडांचीं मूसळें । घेऔनि कांडा शिशाळें
शतरांवीचेंनि दुग्ध मेळें । रांधा क्षीरीं ॥ ४९४
निशाचरीं स्थनांचीं अमृत फळें । यज्ञेंस कालवन शाक मेळें
चीरौनी मेहुन मूळें । करा कुसंबिरीं ॥ ४९५

नर कपालांचा साटीं । पक्कानें विस्तारां गोमटीं
घृतधारां घाला बरवटीं । शोणितांचीं ।। ४९६
आच्चमणें नेत्र सरोवरांची । सू फळें फोडां पीठ मणियांची
अश्व अजा कर्णांचीं । तांबुळें योजा ।। ४९७
करितां देव भूतगणांहारांचें अवतरण । रसिकांची अंतरें डोलवीन
परि दुरीं जाईल आख्यान । आत्मतीर्थाचें ।। ४९८
संहारु केला राक्षसांचा । मेळा संतृप्त जाला भूतगणांचा
वागोवा घेतला कुंभोदराचा । पांचाळ रायें ।। ४९९
ऐसें वधिलें कुंभोदरु निकुंभु । जयवंत जाला पांचाळराज वल्लभु
सुरगणु दाटिलें नभु । करीति पुष्पवृष्टीं ।। ५००
सरला निशीचा भरू । पूर्वे उगवला दिणकरू
नगरजनां देऔनि नाभिकारू । निगाला भूतगणांसीं ।। ५०१
नगरां पश्चिमें नृपवरे । पावकोशाचेनि अंतरें
मेलिकारू केला निर्धारें । निजसैन्येंसीं ।। ५०२
भूतगणां जाली पाठवणी । गेली सत्यादेवी जोगिनी
महाराष्ट्री तिअें दी हौनि । राहिली ठाईं ठाईं ।। ५०३
ऐसें ब्रह्मराक्षसु वधिले । मग राअे पांचाळें कांई केलें
तें श्रोतेयां सांगै वहिलें । मुनी कृष्णया कवी डिंभु ।। ५०४
हा आठवा प्रसंगु अदट । पांचाळें वधिलें राक्षसु सुभट
आतां श्रीदत्त होईल प्रकट । नववां प्रसंगीं ।। ५०५

इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराटदेशोपनामालंकृत-
मयंकराजशिष्यकृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ-प्रकाश
ग्रंथे ब्रह्मराक्षस वध वर्णनोनाम अष्टम प्रसंगः ।। ८ ।।

---




९

## आत्मोत्तम ध्यान

श्रीपरमात्मने नमः

देवल म्हणें असितांसीं । वध जालेयां कुंभोदरासीं
राअे प्रश्नु केला शिष्यांसीं । आत्मोत्तमाचेयां ।। ५०६
राओ म्हणे जी मुनीसत्तमा । ! । ब्रह्महत्या घडली आम्हां
तें पुत्र कीं ऋषिउत्तमा । पुलस्तीचें ।। ५०७
तुम्हीं ब्रह्मज्ञानी पुरतें । तरि नास होअे ब्रह्महत्येतें
बोलावें तेयां उपायांतें । म्हणौनि केला नमस्कारू ।। ५०८
ब्रह्महत्येचें घातले सांकडे । ब्राह्मणां नुगवेंचीं कुवाडें
मग ध्यान मांडिलें निकडें । आत्मोत्तमाचे तेंहीं ।। ५०९
तंव ध्यान करितां वेळीं । आत्मोत्तमु प्रकट जालें जवळीं
देखौनि ब्राह्मणु राजन्यमौळी । संतोषलें मनीं ।। ५१०
साष्टांगीं घालौनि दंडवत । प्रश्न पुसें नृपनाथ
आमुची ब्रह्महत्या निभ्रांत । कांइसेंनि फिटे ? ।। ५११
ऐसा प्रश्नु आइकौनी । आत्मोत्तमु बैसिले ध्यानीं
श्रीदत्तांचें अंतःकरणीं । केलें स्मरण ।। ५१२
नानां वाक्यें निगम सारें । भावगर्भें बीजाक्षरें
नानां सूक्तीं स्तोत्रें मनोहरें । प्रार्थनारूपें ।। ५१३
जयजयाची त्रैलोक्य पावना । ॐनमो श्रीदत्तात्रिनंदना ! ।।
संसार भवबीज विनाशना । समर्था जी ! ।। २१४
जीवांचा फिटावेयां अविद्या भ्रमु । निज परमात्ममार्गोत्तमु
निरौपावेयां सृष्टी प्रथमु । मूळ होसीं ।। ५१५

जय दिव्यांबर भूषणा ! । जय बोधात्मका प्रसन्ना
जय परब्रह्म निरांजना ! । चिद्घनुजी ।। ५१६
जय जीवु प्रपंचा भिन्ना । नमो सच्चिदानंद घना
जय नित्यमुक्ता शरण्या । शरणीं तुज ।। ५१७
केलें श्रीदत्त गायत्री स्मरण । श्रीमूर्ति ध्याइलें ध्यान
तंव उभाठेला ततक्षणा । दिगंबरू तो ।। ५१८
चंद्रोदईं जीवन पावतीं औषधीं । कीं धातु कलंक नाशी सहस्रवेधीं
ना तरी लाभे घुटिका सिद्धी । पुरतीं मनोरथें ।। ५१९
नां तरि बावनोदईं दृमकुळें । होतीं सुगंधें सुशीतळें
तैसें जाले श्रीदत्त दर्शन मेळें । आत्मोत्तम पांचाळासीं ।। ५२०
आत्मोत्तमु लागैला श्री-चरणीं । राओ आला लोटांगणीं
तेणें श्रीमूर्ती नयनीं । देखिलीं कैसीं ।। ५२१
जो परमंगल कैवल्य धरणीं । द्वितीय तेजोमय अमोघ किरणीं
उदेला प्राज्ञाधरू अवनीं । भव-तम नाशावेयां ।। ५२२
आधीची शुद्ध कैवल्य-मूर्ती । वरि दिव्यशक्ती तेजाची ज्योती
ओप सारिली निगुती । ऐश्वर्यादि गुणांचीं ।। ५२३
जरी घातली चैतन्याची गवसनीं । परि किळे फांकैति भीतरौनी
तें श्रीमूर्ती वाचां कव्हणीं । वाणौ आतां ।। ५२४
श्रीमुर्तीचें लावण्यु देखिलें । तेणें विश्वलावण्यु मुरालें
भौतीकु मुर्छावलें । आपुला ठाईं ।। ५२५
लौकीकु राहिलें अधोदृष्टीं । तेथें प्रपंचिकांचीं कवणगोष्टीं
श्रीदत्त लावण्य न माअें सृष्टीं । कां निरौपमुं ।। ४२६
श्रीमुर्तीचें तेज स्फारलें । तेणें वरि प्रभेतें लोटिलें
मंडळ पीवळें जालें । तेणें तेजें ।। ५२७

ब्रह्मानंदाचियां ओला । दिव्य पीत-आरक्त तेजाचां करंबा पाल्हैला
तैसा श्रीमुकुटीं जुडा मिर्विला । केशकळापांचां ५२८
मेनाविला प्रवृत्ति मेणांचां । ओतिला पति कैवल्य निजांशाचा
तो श्रीमुख कैसां श्रीदत्तांचां । वाणी आतां ॥ ५२९
जेयां वाचें होंति निर्मळ । जे अमोघ शक्तीचें राउळ
तें प्र-हसीत श्रीमुख कमळ । श्रीदत्तांचें ॥ ५३०
अति सुरेख पातळ । वंकट भ्रू-भंग नीतळ भाळ
पंचरेखां दाविती स्थळ । पंचकाअेंचीं ॥ ५३१
जेवि नाम-पंचकांचां पोटीं । सदानंद स्वरूपें गोमटीं
तेवि शोभती अरक्तकोरां श्वेतवाटीं । श्रीनेत्राबुंजें ॥ ५३२
कैसें सुंदरू लंबकर्ण । निजभक्तांचें परिसावेयां स्तवन
कर्णीं कुडलें करीति छळन । चंद्र-मंडळासीं ॥ ५३३
पंच कळां हौनि भिन्न । जेथें नांदेति निजकळां स्वर-प्राण
तें सरळ नाशा श्रीमुखि मंडन । वासु घे भक्त जातिचां ॥ ५३४
कैवल्य रंगें गिवसिलें । ब्रह्मतेजें उलासलें
ते सुस्मित मिरविलें । अधरोष्टांतरी ॥ ५३५
कैवल्य मंडळा भीतरीं । जेविं षोडष प्रेम कळांची हारी
तेविं शोभे श्रीमुखांतरीं । सुरंग दंतपंक्ती ॥ ५३६
तेयां श्रीमुखांचा सेजारी । मंजिष्ट रसना तुळिका सुंदरी
घालौनि विसंवे निरंतरी । अमोघ परा-वाणी ॥ ५३७
ब्रह्मविद्येची भाष जैसी तैसी । स्वातंत्रियां न बोलवें आनंदासीं
म्हणौनि रसना दंतपंक्तीसीं । मिळौनि बोलें ॥ ५३८
सकळ पुरुषार्थु शक्ति-चक्राचें । शरणागतु जालें संसाराचें
म्हणौनि प्रतापे निगाले श्रीदत्ताचें । श्मश्रु मिषे बाहिरीं ॥ ५३९

अनंत शक्ती ऐश्वर्याचीं दाटीं । सामावितां न सामाअे सृष्टीं
तिअें धरिली मुष्टीं । कुरुचें करौनियां ॥ ५४०
परावर जेथ मिळालें । तेथ अंशत्रय नामु पावलें
तें श्रीदत्त कंठीं मिरविलें । त्रिरेखां रूपें ॥ ५४१
जीवोद्धरणाचियां काजा । संसार तोंडीं ह्णावेयां पैजा
श्रीदत्ताचियां आजानु भूजा । प्रलंबा दीसतीं ॥ ५४२
वाटितां अमोघ कैवल्य फळें । श्रीदत्तांचीं करतळें
नख मंजिरीसीं लक्षण मेळें । अरक्तें जाली ॥ ५४३
परि तें दवडौनि संसारियांसीं । हृदईं आळंगी निज भक्तांसी
तें खून दावीं निश्चयेसीं । एकावळी वक्षस्थलीं ॥ ५४४
जे रीगतीं श्रीदत्तांचां उदरीं । तेयां त्री-काळ राखैलु नाभिकारी
हें जाणवीतांअे निर्धारी । त्री वळीं तेथ ॥ ५४५
तो पाह्यवेयां साचिवटा । रोमावली मिषें अधोर्ध्वं वाटां
शक्ती हारी एतांतीं नीटा । नाभी स्थानीं ॥ ५४६
कामशास्त्रें ब्रह्मचर्यु त्राशिलें । म्हणौनि श्रीदत्तां शरणु रिगालें
तें मध्य मंदिरी सांटविलें । बेंगटीं जघनाचा ॥ ५४७
अंतकाळीं श्रीमुखावलोकावेयां । निजभक्त मस्तकाचियां होंति ऊसियां
म्हणौनि जंघा जाणु तियां । वोहरतु वस्तुळां ॥ ५४८
वांटौळी गुल्फें कृष्ण कळावियां । धुरा सांडौनि अन्यदेवतांचियां
निजभक्त येंति ओंळगावेयां । श्रीचरणु धुरां ॥ ५४९
तुल्य पंचागीं श्रीचरणीं । विलासैली लक्षणें होऔनी
चरण-महिमा जाणौनि । रंगिले चैतन्य तळीं ॥ ५५०
लक्षणीं वाणू श्रीदत्तांचीं । तरि अघवींचि मूर्ती लक्षणांचीं
परि अपूर्वता वाणीची । कांहीं दाओ ॥ ५५१

जिअें सामुद्रिकें प्रकटु जनीं । तेयां महाकवी वाणितीं उपमा देओनी
परि ध्यानाक्षरांचीं वाणी । सांगतीचिना ।। ५५२

रजस्तमाचा केरूं झाडौनी । भावानुरागें संमार्जनु करौनी
श्रद्धा धृतीचें आसनु घालौनी । हृदय मंदिरांमाजीं ।। ५५३

तेथें श्रीमुर्ती आव्हाणिजे आदरें । अंतरीं पूजाकीजे षोडषोपचारें
मग लक्षणां लक्षौणी चतुरें । ध्यानु कीजे ।। ५५४

मग कार्ये तेयां लक्षणांचीं । ध्यानस्तां पुरुषां बाणतीं अघवींचीं
तैंचीं सिद्धी ध्यानाचीं । जाली जाणावीं ।। ५५५

तिअेंची लक्षणें चतुर्विधें । अव्हांतर उपमा व्यतिरिकान्वये भेदें
जाणावी निरुक्त बधें । क्रांतदर्शी ।। ५५६

लांछनु तीळ भंवरे । अंक मत्स्य पंच प्रकारें
इयें जाणावीं अव्हांतरें । लक्षणें पैं ।। ५५७

रेषां सामुद्रिकें चिन्हीतें । इयें श्रीविध लक्षणें उपमितें
आतां बत्तीस लक्षणें व्यतिरिकें तें । श्रीमुर्त्ती निष्ठे । ५५८

गौर श्यामु दोंनि वर्ण । हेचि मिश्र द्विधां जाण
ऐसें चतुर्विध वर्णलक्षण । जाणावें महंती ।। ५५९

शब्द मंजूळ कंठ सुस्वर । दुर्गंधीशूण्य तनुच्यार
स्थूल ना ऱ्हस्व मूर्द्धा कृष्ण केश चाचर । ऐसीं नवविधें ।। ५६०

चौ विरहीत युक्त रूप जाणा । प्रसन्न वक्त्र निमिष कृष्णा
थोरस तार नेत्र-आरक्ततत्व प्रसन्ना । एसी चौदां ।। ५६१

त्रययुक्त हा सकळां मनोरमु । स्वरगंभीर मंजूळ प्राक्रमु
गुण उपगुण कुशलता उत्तमु । ऐसीं बावीसे ।। ५६२

व्युत्पत्ती च्यातुर्ये कवित्व वादा । शिहाणीव स्फूर्ती सुशीलतां मेधा
प्रज्ञा बुद्धी अष्टविधां । ऐसीं बत्तीस ।। ५६३

इयें व्यतिरिकें बत्तीस लक्षणें । मुर्तीनिष्ट जाणावीं सुजाणें
ध्यानां आणावीं मनें । चिंतौनियां ।। ५६४

आतां अन्वयलक्षणें बत्तीस । तेयांचें सांगैन भेद विशेष
जेयांचीं कार्यें बत्तीस । ध्यानस्तां होतीं । ६६५

केश कर्ण भुजां भाल नाशा । इयें पांच दीर्घें परियेसा
चिंती तेयां पुरुषां । अभय सूचकें ।। ५६६

दंतोष्ट कंठोदर हस्त नखें । इथें पांच ऱ्हस्वें विशेषें
सत्वाची सूचिकें । साधकांसीं ।। ५६७

पद-हस्ताचियां अंगुलिका । ध्वज रोम आणि रेखा
इथें पांच सूक्ष्में संशुद्धी विजयो जे कां । कारणें होतीं ।। ५६८

चरण-कमल नेत्र कक्षा । ललाट पृष्टी विभाग वक्षा
इयें सां उन्नत प्रत्यक्षा । ज्ञान जनकें ।। ५६९

जिव्हा ओष्ट पाणितळें । चरणाधर दंतमूळें
इयें आरक्तें मंगळें । योग सूचकें ।। ५७०

नाभी तळहातें दोनि गंभिरे । व्यवस्थित कारकें मनोहरें
नेत्र भाल वक्ष अें तीन विशाळें सुंदरें । दानसूचकें ।। ५७१

पद जंघा जानु प्रणवदळें । यज्ञ भाग लिंग दळ करतळें
ओष्ट स्थन बाहु दोर्दंड युगळें । श्रवण प्राणरंध्रें ।। ५७२

कपोलें भृ नेत्र दशन पंक्ती । दंताग्र नितंब ऐसीं विसतीं
इयें जाणावी निगुती । सूचकें दमाची ।। ५७३

दोंनि हस्तांगुलें पदांगुलें । इयें विषमें यज्ञसूचकें मंगलें
हस्तशाखा दंतपंक्ती इअें दोनि विरळें । स्वाध्याय कारकें ।। ५७४

श्मश्रु कुचं पद-शाखा । इअें तीनि नाशाद्र तपकारकें आइका
मुख स्कंध स्थन चक्रें नका । गुल्फें नितंबु ।। ५७५

इअें सातु वर्तुळें आर्जब सूचकें । कंठोदर दोर्दंड भुजादिकें
इअें च्यारी संवळितें सूचिकें । अहिंसकत्वाचीं ।। ५७६

हस्त पदांचें अंगुष्टें अंगुलिका । भुजा दोर्दंड जंघा जानु आइका
इअें आठै सत्यसूचकें देखा । अतिसरळ तरें ।। ५७७

भाल दशन वक्ष पद-तळें । पृष्टिभाग इअें पांचै समतळें
अक्रोध सूचकें मंगळें । जाणावी ज्ञातीं ।। ५७८

दोर्दंड जंघा जानु हा त्रिकु । वर्तु वोहरतु तें त्याग सूचकु
नाशा जिव्हा कोपर हा चौकु । तीक्ष्णाग्र शांतिसूचक ।। ५७९

भ्रुरा कपोल नाशा तींनि उच्चतरें । अ-पैशूण्य सूचकें सुंदरें
कळाविया माज उदर निर्धारें । कृष्य दया सूचकें ।। ५८०

अपांग दंतपंक्ति । भृ-भंग कर्ण व्यक्ति
इअें च्यांरी वक्ते बोलिजेति । अलोलत्व सूचकें ।। ५८१

भृकक्षा अधर मस्तक । नेत्र पत्र हृनूपस्थ सप्तक
स रोम मार्दव सूचक । जाणिजे पै ।। ५८२

नाशा भाल भुजा दोर्दंड पद पाणीतळें ।
जंघा जानु जघनोदर पृष्टिकपोले
हनू वक्ष नितंब निर्रोमाळें । लज्ज्यासूचकें पंधरा ।। ५८३

दंत नखे अें दोन्हीं समुज्वलें । अ-चापलत्व सूचकें निर्मळें
केश स्थानाग्रें नयन तिन्हीं सुनीळें । दिप्तीसूचकें ।। ५८४

ग्रीवा रदन सामान्यस्थूलें सुंदरें । क्षमा सूचकें मनोहरें
स्कंध नितंब दोंनि स्थूलतरें । धृत्ती सूचकें ।। ५८५

नाशा दंत कपोलें स्थूलें तिन्हीं । शौच सूचकें जाणावी मुनी जनीं
तळवे तल्हात स कोमल अे दोंनी । अद्रोह सूचकें ।। ५८६

कर चरण वाम सव्य विभाग । मुख पंकज पूर्व पश्चिम भाग
इअें सातु मृदुत्तरें चांग । सूचिती नातिमाविते तें ५८७
दंत कपोल भाल नयनांबुज । नाशा त्वचा पदपंकज
इअें सातें श्नेह् सूचकें सहज । जाणावी पै ।। ५८८
त्वचा नाशा अंघ्रि कपोळें । भाल दंत इअें सा नीतळें
प्रवृत्ति निवृत्ती कारकें मंगळें । बोलिलीं शास्त्रीं ५८९
ब्रह्मांड कर्ण स्थन मडळ तीनि । सछिद्रें जाणावी मुनिजनी
इअें आचार सूचके ध्यानी । ओळखावीं पै ।। ५९०
ऐसी बत्तीसान्वय लक्षणीं । श्रीमुर्ती लक्षिजे जरि ध्यानी
तरि लाहिजे मुनिजनीं । ध्यान सिद्धीतें ।। ५९१
ऐसीं अव्हांतर आणि उपमितु । व्यतिरिके आणि आन्वयोक्तु
ऐसीं बाहात्तर लक्षणीं शोभतु । श्रीमुर्ती दत्ताचीं ।। ५९२
ऐसें श्रीमुर्तीचें वर्णन । मिया नेणतां केलें ध्यान लक्षण
परि झणीं कोपती संतजन । मुनि कृष्णया कवी- डिंभासीं ।। ५९३
हा नववा प्रसंगु मंगल । श्रोतेयां वक्तेयां होअें ध्यान-फळ
जेथ आत्मोत्तमाचेंनि ध्यानें पांचाळ ।
लाधला श्रीदत्त योग ।। ५९४

इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराटदेशोपनामालंकृत-
मयंकराजशिष्यकृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ-प्रकाश
ग्रंथे आत्मोत्तम ध्यान वर्णन नवम प्रसंगः ।। ९ ।।

# १०

## ब्रह्महत्या निराश

श्रीपरमात्मने नमः

ऐसां देखौनि श्रीदत्त देओ । स्नेहें उचंबळैला पांचाळराओ
निशानां लाऔनि घाओ । लाविली मंगल वाद्यें ।। ५९५

षोडषोपचारीं केलीं पूजा । आत्मोत्तमें म्हणितिलें श्रीदेवराजा
तुझेंनि वरदाने मारिलें पैजा । पांचाळें ब्रह्मराक्षसु ।। ५९६

कार्य केलें साधु संतांचें । परि दूषण घडिलें ब्रह्महत्येचें
क्षालन करावे तिअेचें । कृपावंता ! ।। ५९७

मजवरी अनुग्रहो केला जैसां । पुत्रांसह पांचाळ तैसां
उद्धारावाजी श्रीपरेशा ! । कृपा करौनी ।। ५९८

देवल सांगे असिता प्रती । आइकौनि आत्मोत्तमाचीं विणती
मेघ गंभीर वाचा श्रीपती : बोलतां जाला ।। ५९९

देओ म्हणें पांचाळासीं । एथ बाण घालावां भूमीसीं
पाताल-स्थितु जलासीं । आणावे तुआं ।। ६००

ऐसे आइकौनि देवांचें वचन । राअें घेतला धनुष्य बाण
कानाडी ओढी ओढुन । घातिला बाण भूमीशीं ।। ६०१

तो भेदौनि गेला सप्त-पाताळें । अवरुणोदकु उसळैलें सर्व-तीर्थ-मेळें
चर्णस्पर्शोनि तारागण-मंडळें । गेला स्वर्गु लंघौनी ।। ६०२

तेथें महेशें ओढविला मुकुट । जटांजूटीं धरिलां लोट
विषे करौनि जळतां कंठ । शीतळु होआंवेयां ।। ६०३

निअें तीर्थ कुंडीं मनोरमें । श्रीदत्त चर्णु क्षाळिलें आत्मोत्तमें
मग आपण स्नानु केलें संभ्रमें । तिअें चरणोदकीं ।। ६०४

मग म्हणतिलें श्रीदत्तात्रेयदेवें ।
राया ! इअें आत्मतीर्थी स्नानु करावे
ब्रह्महत्ये पासौनि मुंचावें । पुत्रां सहितु ॥ ६०५

देबल असितासीं म्हणें । आइकौनि दत्तांचीं अमृत वचनें
मग राअें पुत्रां सहितु केलीं स्नानें । तिअें आत्मतीर्थी ॥ ६०६

स्नानें करितां क्षणीं । ब्रह्महत्या पळतां देखिली नयनीं
निगाली सर्वही किल्मषें घेऔनी । स पुत्रीं रायाचीं ॥ ६०७

आत्मनाथे श्रीदत्तें । आपण आणवीलीं सर्वतीर्थें
वरि स्नानु केलें सद्भक्तें । आत्मोत्तमें पै ॥ ६०८

ऐसां देवां-भक्तांचा योगु । तिअें तीर्थी जाला स्नान प्रसंगु
म्हणौनि आत्मतीर्थ नाम अभंगु ।
जालें सृष्टीं काळ वेन्हीं ॥ ६०९

मग आत्मवापी भंवतें । पुरुषाकार स्थंडील केलें निरुतें
तडाग केलें तेयां भंवतें । वर्तुळाकारू ॥ ६१०

आत्मालये तेयां ठेविलें नाम । देवल म्हणें असितोत्तम !
ऐसां आत्मतीर्थ महिमा निरोपम । निरौपिला तुज ॥ ६११

या वरी राअें पांचाळें । देवांचीं नमस्करौनी चरण-कमळें
मग जोडौनि कर कमळें । विणवितां जाला ॥ ६१२

म्हणें श्रीदत्ता निरंजना ! । या विज्ञानेश्वरां माझेयां नंदनां
देयांवी जगज्जीवना ! । श्रीचरण सेवा ॥ ६१३

हा होईलु तुमचा किंकरू । तेणें फिटैल आमुचा भवसंसारू
तिअें वेळीं देवें केला अंगिकारू । विज्ञानेश्वराचां ॥ ६१४

राअें आत्मालय दक्षिणे पांचालेश्वर । लिंग स्थापौनि प्रसादु केला सुंदर
तेथें ग्रामु वसविला मनोहर । पांचालेश्वरु नामें ॥ ६१५

राजाळें आणि तेजाळें । राजादेवी तेजादेवीची देउळें
पांचाळेश्वरा सेजी मंगळे । केलीं इशान्य कोणीं ।। ६१६

आत्मालया हौनि उत्तर दिशेसीं ।
आप्तकुमरें स्थापिले आप्तेश्वरासीं
नगरूं वसवीलें तयासीं । म्हणती आप्तग्रामु ।। ६१७

ऐसा करौनि आख्यानां । घेऔनि श्रीदत्ताची आज्ञा
राओ निगाला सह-सैन्यां । तिघां पुत्रां सीं ।। ६१८

गेला पांचाळ नगरां । तेथें राणीव करितां नृपवरां
आयुष्यांती मह कुमरां । पावला ब्रह्मलोकीं ।। ६१९

ब्रह्मलोकींचें सुख भोगौनी । पुनर्जन्मीं जाला ब्रह्मज्ञानी
तापसें श्रीदत्त सायुज्यता निर्वाणी । पावता जाला ।। ६२०

आतां कवी-डिंभु कृष्णमुनी । साधुसंता विणवीं कर जोडौनी
दुसरें आत्मतीर्थाख्यानु देवलमुनी ।
मांघैलु असिताप्रतीं ।। ६२१

ऐसें हें पुण्य पावन । जेणें फिट ब्रह्महत्येंचें दूषण
आइकितां आत्मतीर्थाख्यान । दाहावां प्रसंगीं ।। ६२२

इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराटदेशोपनामालंकृत-
मयंकराजशिष्यकृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ-प्रकाश
ग्रंथे ब्रह्महत्या निरास वर्णन दशम प्रसंगः ।। १० ।।

## ११

## विज्ञानेश्वर पददान

श्रीपरमात्मने नमः

देवल म्हणे असिता ! । विज्ञानेश्वर भक्त जाला श्रीदत्तां
तेयांचा पवित्राख्यानु आइके आतां । सावधचित्तेसीं ।। ६२३

श्रीदत्त पाहे जिकडें जैसा । कर जोडौनि उभा तिकडें तैसा
छिन्न मूळ द्रुम भूतळीं पडे जैसां । नमस्कारु घाली ।। ६२४

श्रीदत्तांचीं पर्णासनें पात्रें । पादुका उपाहनो वस्त्रें
छायादि करौनि पदमात्रें । ओलांडी ना ।। ६२५

ऐसीं भक्ती करितां नृपोत्तमां । क्रमीनिली शतवत्सरु सिमां
तंव देहांती उपदेशिलें तारक ब्रह्मा । श्रीदत्ते तेयांसीं ६२६

विज्ञानेश्वर विणवी श्रीसद्‌गुरुतें ।
जंववर सापे तेजोनीळाकाशु वरुतें
तंव पर्यंतु माझियां स्थानातें । त्यजावे ना जी ।। ६२७

हेंची असें विणवणी । आपुला सेवकु होतां भक्तु म्हणौनी
से न संडावी अंतःकरणीं । रंकासी निरंतरू ।। ६२८

तें श्रीदत्तें माणिलें । मग विज्ञानेश्वरे देहां विसर्जिलें
उपरी तेयांसीं संस्कारिलें । आप्तेश्वरां उत्तरें ।। ६२९

विज्ञानेश्वराचेयां कुलोपाध्यासीं । श्रीदत्तें स्वमुखें तेयांसी
लिंग प्रतिष्टावें ऐसीं । दीन्हली आज्ञां ।। ६३०

तेणें लिंग केलें उत्तमु । संस्कार स्थळीं निरोपमु
श्रीदत्ते स्वयं दीधला महिमु । लिंगा स्थापावेयां ।। ६३१

जेधवां लिंग स्थापिलें । अग्रोदकु श्रीदत्तें पाहिलें
स्थापणेयांत्मतीर्थींचे जल आणवीलें। कुलोपाध्यां करवी ॥६३२

उपाध्या जलां आणौ गेला । तंव वेगु न धरवेंचि देवाला
मग तो कांईं करिता जाला । सर्वतीर्थ नाथू ॥ ६३३

दोंहीं जानूमध्यें मेखला घालौनी । दक्षिण मुखें ओणवेयां होओनी
बळें मुष्टी रोविलियां दोंनी । लिंगमेखळेसीं ॥ ६३४

तियां गेलियां सप्तपाताळें भेदौनी । विश्वोदकू आणिले तळौनी
उपाध्या येई तंव स्थापना करौनी। जालें आसनीं उपविष्ट ६३५

उपाध्या देखे कुतुक दृष्टीं । मेखळेंसीं दोंनि छिद्रें गोमटीं
उदकु निगतांअें भडभडां दाटीं । आंतौनियां ॥ ६३६

उपाध्या वदीनिला जी देवा ! । न कळतां तुझियां मावा
सर्वतीर्थांचा मेळावा । असे तुझां श्रीचरणीं ॥ ६३७

पुनती उपाध्या दोंनि जलीं । स्थापण करी तिअें वेळीं
लिंगा उत्तरें तेहीं छिद्रयुगळीं । सांळकां नांदताअें ॥ ६३८

देवल म्हणे असितुऋषी ! । श्रीदत्तें आणिलें तीर्थासीं
तेणें कलियुगें विज्ञानेश्वरासी । म्हणजे आत्मतीर्थ ॥ ६३९

जो आत्मतीर्थ ब्रह्महत्या क्षालन । विज्ञानेश्वरात्मतीर्थु संसारमोचन
जेयां यथाविधी घडें दों तीर्थीं आर्चन। तेयां भवसंसारु निवृत्ती ॥६४०

श्रीदत्तात्रेये लिंगु स्थापिलें । विज्ञानेश्वर तीर्थां नामु ठेविलें
श्रीदत्तात्रेय निर्मिले । म्हणौनि वंद्य देवांसीं ॥ ६४१

आत्मालय तळें पांचाळें निर्मिलें। तेथ माध्यानकाळ पर्यंत लीळें
श्रीदत्त सदां जळकेळी खेळें । आत्मोत्तमु वरदानार्थीं ॥ ६४२

तडागा काठीं नैऋत्य दिशें । श्रीदत्तांचां भोजनु स्थानु असें
तेयासीं मुनिजन गुंफा ऐसें । बोलतांति देखा ॥ ६४३

या नंतरे बहुतांकाळें त्रेतायुगीं । गौतमें गंगा आणिली ओघीं
सैकत आच्छादिलें तिअे प्रसंगी । आत्मतीर्थ कुंडां ।। ६४४

ध्वंसिले आत्मालय तळें । तऱ्हीं श्रीदत्तात्रेय प्रभु राउळें
तेथ सर्वदा माध्यान काळें । क्रीडा कीजताअे ।। ३४५

महाविस्तीर्ण रूप विशाल । धरौनि देवराओ सर्वकाळ
शिकतें संबंधु देताएं मंगळ । नाहीं अन्य पदार्थीं ।। ६४६

विज्ञानेश्वराचे वचन । सत्य करावेयां आपण
सदाविज्ञानेश्वरां आसन । स्थापनु करीतुसें ।। ६४७

संता विणवी मुनी कृष्णया कवी-डिंभु । आत्मतीर्थ कथा जालीं सुलभु
आतां आणीक असितां कथा दुर्लभु । देवल सांघैल ।। ६४८

एकादश प्रसंगीचे आख्यान । विज्ञानेश्वरां श्रीदत्तांचें सन्निधान
अंती निजपदु देऔनि तयाचें अभिधान । जगद्वंद्य केलें ।। ६४९

इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराटदंशोपनामालंकृत-
मयंकराजशिष्यकृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ-प्रकाश
ग्रंथे विज्ञानेश्वरा पददान वर्णन एकादश प्रसंगः ।।११।।

---

## १२

## अवतारत्रय संयोग

श्रीपरमात्मने नमः

देवल म्हणे असितामुनी । आत्मतीर्थ विज्ञानेश्वर महातीर्थु दोंनी
तीसरें सर्वतीर्थं कैवल्यदानीं । श्रीदत्तें निर्मिलें ।। ६५०

ऐसें कल्पादौ त्रेतीं वर्त्तले । द्वापार संपौनि कलियुग रिगालें
तंव अपूर्व कांइं वर्तलें । ते आइकां पां ।। ६५१

जो धर्मऋषीचा दुसरा कुमरू । त्रेतीचा आचार्या जया नांमु नरू
तो ची कलियुगीं अवतारू । धरितां जाहला ।। ६५२
प्रथम शाखें अवतरला । सातां वरुषां व्रतबंधु जाला
वेदाध्ययन करौनि आला । गोदा तीरासीं ।। ६५३
नेथ सासटिंचा पिपळ पत्तनीं । संन्यासु घेतला पंचदेओ धामनी
मग पांचाळेश्वरां येऔनी । श्रीदत्त भोजन गुंफेसीं ।। ६५४
देखावेयां श्रीदत्तप्रभु । उत्कंठीतु जाला गोविंदप्रभु
मग आरोगणा समईं दर्शन सुलभु । दोघांहीं जाला ।। ६५५
नमस्करौनि श्रीदत्तांसीं । गोविंदप्रभु बीजेकरी द्वारावतीसी
आणीकु नवलाओ असितांऋषी । आइकै तूं ।। ६५६
पांचवा धर्मऋषीचा जो सुतु । जो कलियुगीचा आचार्य प्रशांतु
तेयांचां अवतरण संकेतु । भरवसे सीं ।। ६५७
नागरुं सामशाखें अवतरला । राज्यलक्ष्मी सांडौनि निगाला
प्रभुयोगें यतिवेषु जाला । क्रीडें जीवोद्धरणीं ।। ६५८
सिद्ध महापुरुष चक्रेश नामु । तो स्वभक्तांसहितु पुरुषोत्तमु
तो एकदां कार्त्तिकां श्रीदत्ताश्रमुं । येता जाहला ।। ६५९
गंगा तीरां बीजे करितां । रामेश्वर पापविनाश तीर्थां
निजसंबंधु जाला देतां । केलीं सकल तीर्थें ।। ६६०
मग येऔनि विज्ञानेश्वरांसीं । विटक मागौनी निज किंकरांसीं
श्रीदत्त महिमा उमटावेयांसीं । काय करितां जाला ।। ६६१
ऊदकें करौनि स्वपंनां । वीटकादि फल पुष्पें वाऔनी देवराणा
स्व करें करीं स्पर्शना । विज्ञानेश्वरातें ।। ६६२
बलाहक ग्रामीं महाजनु पूजा । स्वयं स्वीकरौनि देवराजा
गंगा उतरौनि श्रीदत्ताश्रमां ओजा । करीं आगमनातें ।। ६६३
मग येऔनी पांचांळेश्वरीं । स्थीरू जाला गंगातीरी
द्विज प्राण-घातां निवारी । करवी गुंफालयां ।। ६६४

एक दीं नेणतांचीं सेवकांसीं । भेटी जालीं श्रीदत्तासीं
तंव खूणेची जाणवीति येरूं येरांसीं । जीवोद्धरणु परी ॥ ६६५
मग भक्तांसीं तो देवराणा । श्रीदत्तात्रेय भोजनस्थानां
जाऔनि दावी विश्वजनां । वंदने हेतू ॥ ६६६
पांचाळेश्वरीं करी वासु । जीवोद्धारक जो परेशु
मग स्वीकरी पुत्रत्व विशेषु । एका भाग्यवंताचा ॥ ६६७
तंव निरोपी श्री चक्रधरू । जो येथें पंचपर्वार्चन करी निर्धारू
आणि करी स्नान दानादि स्मर्ण विचारू : तेयां भंव बाधा असेंचिना
सूर्य सोमाणि सोमवती । दमनक पूजाणि पर्व पविती
इये पंच पर्वीं येऔनि निगुती । श्रीदत्तार्चनु करांवे ॥ ६६९
ऐसें माहात्म्य निरोपौनी चिद्घनें । पांचालयांचें आख्यानें उपाख्यानें
स्वयं प्रकटौनि जगज्जीवनें । मग बीजेकरी ॥ ६७०
तेथौनि अवधूत स्कंधा रोहुनी । गंगाजलां उतरौनी
पैल थडिअें स्थीरू होऔनी । सांगी श्रुक्राख्यानु ॥ ६७१
जो यती मुनी वेषें भूतळीं । जीवोद्धरणां विचरें सर्वकाळीं
तो सदां माध्यानकाळीं । भोजनु सारीतुसें ॥ ६७२
ऐसा महिमा आत्मतीर्थाचा । जेथें प्रकट योगु तीं अवतारांचा
शुक्ल चैत्र चतुर्दशीं सी साचा । दमनक पर्वां पंच कृष्णां योगु ॥
हे आत्मतीर्थ माहात्म्य असितां । मजशीं सांगता जाला महपिता
देवल म्हणे यथाश्रुत महंता । कथिलें तुज ॥ ६७४
असीत म्हणें देवलासीं । तुम्हीं पवित्रकेलें आम्हांसीं
निरोपिलें श्रीदत्त ध्यान स्मर्णासीं । आत्मतीर्थ महात्म्यमिषें ॥
पूजा करौनि असीतें । साष्टांगी घातिली दंडवतें
आज्ञा मागौनि देवलाते । गेला स्वाश्रमांसीं ॥ ६७६
या आत्मतीर्थ वर्णनु मिषें । कवी-डिभें मुनी कृष्ण-दासे
स्तवनार्चन केलें उल्लासे । निरोपणु श्रीदत्ताचें ॥ ६७७

जय शुद्ध बुद्धा परीपुर्णा । जय निःप्रपंचा जगत्कारणा
जय अमूर्ता मूर्तीवंत सगुणा । श्रीदत्ता तुज नमो ।। ६७८
जय परमानंदा पवित्रा । जयगुणार्णवा शाश्वत परत्रा
जय नित्यमुक्ता जी पंचवक्त्रा । श्रीदत्ता तुज नमो ।। ६७९
जय परावर उभयदृश्य सूक्ष्मा । जय सर्वत्रगमना गगणोपमा
जय देशकाल सहायका सर्वोपमा । श्रीदत्ता तुज नमो ।। ६८०
जय गुणिधर्मी शोधक वेधका । जय ज्ञानविज्ञानें द्रावका
जय सर्वकळां प्रकाशका । श्रीदत्ता तुज नमो ।। ६८१
जय सर्ववंद्या सर्वात्मका । जय जगदोद्धारा स्वयं प्रकाशका
जय आर्त्तदानीं जगज्जनका । श्रीदत्ता तुज नमो ।। ६८२
जय अनसूयात्रि नंदना ! । जय ऋषी कुळां जिवोद्धरणा
जय अलर्का त्रीतापु हरणा । श्रीदत्ता तुज नमन ।। ६८३
जय गोरक्ष बोधका दयार्णवा । जय शंकर वरदायका मयार्णवा
जय ऋषि ऋचिका देशीं वारूंव्हां । श्रीदत्ता तुज नमन ।। ६८४
जय यदुराजया वयनदानां । जय कार्तवीर्या भुजांदानां
जय जमदग्नि भाजा कारण दहनां । श्रीदत्ता तुज नमन ।। ६८५
जय वारानशीं स्नानु वरदा । जय बद्रिकाश्रमी ज्ञानप्रददा
जय जंबुकारण्य पौरी भिक्षा प्रदा । श्रीदत्ता तुज नमन ।। ६८६
जय आत्मालयीं भोजन नियमा । जय देवदेवेश्वरीं निद्रोत्तमा
जय वनदेवां क्रीडसीं पुरुषोत्तमा । श्रीदत्ता तुज नमन ।। ६८७
तुझेंनि नामस्मर्ण बळें । महा काळांवरीं बांधिले दळें
तूं आपुलेयां भक्तां अडनी वेळें । सहाय होसीं ।। ६८८
तुझें सदा करितां चिंतन । तेणें तूं मजवरी जालासीं प्रसन्न
म्हणौनि आत्मतीर्थ प्रबंध रचना । कळसां आलीं ।। ६८९
आईकितां पवित्र होतीं श्रवणें । सुच्चारितां दोष नाशती रसनें
निर्मळ होतीं अंतः करणे । पुरैति मनोरथें ।। ६९०

शताष्ट तीर्थांचें स्नानु निर्मळें। जे पुण्यें तेयां होनि ग्रंथश्रवणें आगळें
दर्शनार्चनें दोषें नासती सकळें । महापातकादि ।। ६९१
श्रीगुरू मयंकाचेनि ज्ञानोपदेशें। वरि भीष्माचार्याचेंनि प्रबंध निर्देशें
श्रीदत्तार्चन केलें या ग्रंथ मिषे । वर्णन शुधार्थीचें ।। ६९२
म्हणे कवीडिंभु मुनी कृष्णदासु। ययांग्रंथा नांव आत्मतीर्थ प्रकाशु
आइकितां श्रोतेयां उपजे उल्लासु । श्रीदत्त स्मरणाचा ।। ६९३
अंती हा बारावा प्रसंगु । जेथ मूर्ती त्रययौगु
आइकितां होअे भंगु । महा पातकांशीं ।। ६९४
★ शके पंधरा शते एक्यांसी । विकारी संवत्सर जेष्टमासी
शुक्रवासर आष्टमीसी । कृष्णपक्षी ।। ६९५
★ ग्राम नेउर खटा दंडेशु । तेथ वैराटोपनाम मुनी कृष्णदासु
तयाचेचि करण आत्मतीर्थ प्रकाशु। संपला तत्हस्ताक्षरे ।। ६९६

पांचालात्मोत्तमाभ्यां हि प्रदत्तं दर्शनं यथा ।
देहि मे कवि डिंभाय तथा दत्त जगद्गुरो ।।

इति श्रीमन्महोपाध्याम्नायदीक्षितविराटदेशोपनामालकृत - मयंकराजशिष्य कृष्णमुनिना विरचिते आत्मतीर्थ-प्रकाश ग्रंथे अवतारत्रय संयोग वर्णनोनाम द्वादशः प्रसगः ।।१२।।

।। श्रीदत्तात्रयार्पणमस्तु ।।

---

★ ह्या स्थलकाल वाचक दोन्ही ओव्या मूळ प्रतींत नाहींत म्हणून मी त्या देशपांडे प्रतींतून घेतल्या आहेत.

प. पू कै. महत श्री गोपीराज बुवा मुसाफिर यांनी प्रा. रा. ब. माळेकर यांस याच दोन ओव्या लिहून पाठविल्या त्यांत थोडा बदल असल्यामुळें त्या देखील येथें देत आहे.

शके १५ शते एक्यांसी । विकारी संवत्सर जेष्ठमासी
शुक्रवार अष्टमीसी । कृष्णपक्षी ।।
ग्राम नेउरखेडा उदेशु । विराटदेशोपनाम कृष्णदासु
त्याचे करण "आत्मतीर्थ प्रकाशु" । संपला हस्ताक्षरें ।।

॥ श्रीचक्रधरः शरणम् ॥

**कवि डिंभ मुनि कृष्णदास**

**वि र चि त**

# स्ववृद्धाचारप्रबंध

**( स्ववंश वर्णन )**



ज्ञाने स्वर्ग जाती । जीव उद्धरीलें
त्या चक्रेशा नमीलें । कृष्णराया ॥ १

शंकरा, कीर्तीवीर्या । केले वरदान
अनुसया नंदन । नमन माझें ॥ २

केले विद्यादान । द्वारकेपट्टनी
त्या श्रीचक्रपाणी । नमन माझें ॥ ३

वैदर्भ देशांतरी । क्रीडे बाळ लीळा
त्या श्रीप्रभु कृपाळा । नमन माझें ॥ ४

अमूर्त मूर्त जालें । जीवोद्धर्णा
तो कैवल्याचा राणा । नमु चक्रधरु ॥ ५

श्रुष्टांतरी ऊळला । कैवल्याचा घन
तो नमीला परीपूर्ण । मायबापु ॥ ६

कृपावशें जीवां । अधिकरणु केला
तो आचार्या नमीला । नागदेऊ ॥ ७

निऱ्हा महामोह । रवीतत्व जाला
तो संतजन निर्मिला । विश्वी बापें ॥ ८

कृष्णें कल्पी । त्या ईश्वर पैं जाणा
तो दावीला गहना । कल्पवृक्षु ॥ ९

बोधामृतरसु । दाटला फळभारें
ते केशवादि मुनीवरे । नमीयेलें ॥ १०

तयासी कल्पफळें । स बीजे लागली
तें त्रयोदश नमीली । मुनि वृंद ॥ ११

पांच शत सिक्ष । तया श्रीनागदया
अम्नाय तेरा । तया माजी ॥ १२

जनार्दन नाम हे । सा कवि दिवाकरा
मयंका साळकरा । नमन माझें ॥ १३

कुमर दामोधर । हरी जाखदेवा
मादळस जयदेवा । नमन माझे ॥ १४

पारमांडल्य योगीया । आम्नाये तेरा
मुख्य आचार्य सर्वा । प्रणिपात्तु ॥ १५

नयामाजी आमचे । पूर्वज पैं जाणा
तया जनार्दना । नमीयेले ॥ १६

उपाध्या आणीले कंजारच्या
नागदेवा मुख्या । बोधजया ॥ १७

नागदेवा सरीसी । उदभव पावनी
कंजारव्य योगीनी । नमु सये ॥ १८

नागदेओ आला । परामृत ओला
तो कल्पतरु लागला । नवपल्वें ॥ १९

पुणें देश प्रांती । वाल्हे पाटनी
ज्ञान त्रय लक्षणी । ख्यातीमंत ।। २०
ज्ञान द्वय पात्र । परग विरक्ती
सौरभ्य बाहाकाती । ध्यानचेनि ।। २१
अडुताळीस सिक्षें । जीयेचें सुबोधी
ते मुनि वृंद । वंदीयेलें ।। २२
तयांमाजी आचार्ये । जाले सहाजण
तयां माझे नमन । सर्वभावी ।। २३
हीरंबा, पोमंबा, । चौडंबा, योगीणी
हरी भान मुनि । धना बाई ।। २४
या साही माजी । पोमंबा वडील
जे जाली मूळ । आम्हांसी ।। २५
कजारव्य रंगीली । सुवेध करोनी
तें पोमंबा भृंगीनी । नमु तया ।। २६
ना ना तें महंत । कंजारव्य योगिनी
वर्षली धवधनी । लीळामृतें ।। २७
पोमंबा चरणीं । सुरत्न लाधलें
सांष्टांगीं नमीलें । बांबेराज ।। २८
ज्ञानाचे लक्षण । भक्तिची चाउरी
वैराग्य छत्रावरी । राज्यकेले ।। २९
लीळा हेतुकारी । सदा लक्ष जया
महणतया । हेतुकार ।। ३०
माहुली दुर्योधन । जेणें पें वेधीला
अचळां समर्पिला । बांबेराज ।। ३१

मार्गा माजी । ज्ञान पदी टीका
तया उपाध्यांत । बांबेराज ॥ ३२

अकोल पाटनी । जया वस्ती स्थान
बांबेराजा वंदन । सर्वभावीं ॥ ३३

अचळ शिवें । एकाकी चरीत्रे
यागु आला पवित्रे । बांबेराजु ॥ ३४

दोनी भेटी तयाच्या । निर्वाळा जालीया
तीसरी सुफळा । जाली त्याची ॥ ३५

आखंड स्मरण । श्रीमूर्ति । अभास
दावी श्रीपरेश । बांबेराजा ॥ ३६

स्मरणाची भास । जाणे जैसी तैसी
तो पुर्वज अम्हासी । बांबेराज ॥ ३७

बांबेराजा शिष्य । जाले बहुत
तें आचार्ये समस्त । वंदीयेलें ॥ ३८

बांबेराजा शिष्य । परज्ञान जया
तो नमीला योगीया । मल्लनाथु ॥ ३९

ज्ञानभक्ति जया । बानली विरक्ती
तो नमीला यती । मल्लनाथु ॥ ४०

श्रीमल्लेनाथा । मुखी ज्ञान जाले
त्या साष्टांगी वंदीलें । सोमेंराज ॥ ४१

अभिमानाचे बोलने । आइकोनीया
गेला प्रसाद सांडोनी । परदेशासी ॥ ४२

ज्ञान पुरुषार्थें । वैराग्य धैर्ये
ते शोभे ऐश्वर्ये । सोमेंराजा ॥ ४३

कर्मधर्म विद्धि विखो । परित्यजोनिया
तो बानला योग । सोमेंराजा ।। ४४
वाईदेशकर । साजे उपनाम
तो वैराग्या विश्राम । सोमेंराजा ।। ४५
आनंत शक्तिचक्र । जयाच्या उदरी
तो हृदय मंदिरी । सोमेंराजा ।। ४६
सकळ आचार्ये । खोलती जयासी
तो जाण वंशी । सोमेंराजा ।। ४७
माझीये पै वंशी । धूर पुससी वोरके
तेणेंनसी अलगटें । सोमेंराजा ।। ४८
नाहीं द्रव्या चाडु । पदार्थाची गोडी
तो माझीये पीढी । सोमेंराजा ।। ४९
ज्याच्या दर्शनी । म्लेंछ कुष्ट गेला
तो निर्भय देश केला । सोमेंराजे ।। ५०
गुर्जरा चक्रपाणी । आला पैं टाकुनी
तो सोमेराज मनी । नमीयेला ।। ५१
निरसा निराक्षा । निराश्रय सदा
दान दीघलें मुकुंदा । सोमेराजा । ५२
स्मरणाचे कार्यें । पै बोलीयेली
ते पैं बानली । सोमेराजा ।। ५३
सोमेराजा जिव्हां । सोडस संवादु
जेणें स्मरणा आनंदु । पावुंनियां ।। ५४
साटी सिक्षे जयाचे । सुबोध विरक्त
तयां प्रणीपात । सर्वभावें ।। ५५

सोमेराजा शिष्य । आचार्ये व्यूतपन्न
तया साष्टांगी नमन । सर्व भावें ।। ५६

यमेराज आणि । बांबेराज जाणा
सालेराज व्यूतपन्ना । नमन माझें ।। ५७

चाल्हेराजा बल्लाळा । नमु गोपीनाथा
धानंबादि समस्ता । प्रणीपातु ।। ५८

सोमेराजा शिष्य । नमन साजनी
तो आचार्या शिरोमणी । येमेराज ।। ५९

बोलता गंभीर । व्यूतपन्न समुद्र ।
तो नमीला मुनिंद्र । यमेराज ।। ६०

आचार खडतर । ऐसा नाहीं दूजा
तया "यमेराजा" । प्रणिपातु ।। ६१

आसन प्रतिष्ठा । सांडौनि प्रसादु
सेवीला आनंदु । यमेराजा ।। ६२

यमेराजा मुखी । ईश्वर प्रतीती
बानली बोधशक्ती । देमेराजा ।। ६३

सौजण्य शिरोमणी । माझीये वंशी
तो यमेराजा शिष्य । देमेराज ।। ६४

आनंद सागरु । सेवीयेला जेणें
तया यमेराज नंदन । देमेराजु ।। ६५

अण्य सामग्री । त्यजूनीयां दूरी
देमेराजु ईश्वरीं । स्थीरा जाला ।। ६६

देमेराजा मुखें । बोधु जाला जया
तमन माझा तिया । भानाई आवा ।। ६७

देमेराज शिष्यनी । नमीयेली योगिनी
पूर्ण आचार गुणी । देमम्बा आई ॥ ६८
मंगळ मूर्ति देओ । अखंड ध्यानी
देमाम्बे योगिनी । नमन माझें ॥ ६९
शांती धैर्य गुण । औदार्य बानलें
देमाम्बा वंदिली । श्रेष्ठ बुद्धि ॥ ७०
बोले पै मंजुळ । कोमळ अंतरी
ते बहुता अधारी । देमम्बा आई ॥ ७१
देमाम्बा महतारी । अखोरी अबोती
गेली देवा भेटी । आत्मभावें ॥ ७२
देमाम्बा योगिनी । प्रत्यष्टा पातली
तें मिया वंदीली । साजाबाई ॥ ७३
देमाम्बे संगती । जालें जया ज्ञान
तिथा माझें नमन । पांचा ॥ ७४
जिउबा सारंग । आनंत महेश
येल्हन पांचशिष्य । देमाम्बें चे ॥ ७५
दोघीं बाइया । तथा गोमाईया
देवो सोनाया । जोडीयेला ॥ ७६
ऐल सीताइया । ईश्वर चिन्तन
सा कोडी स्मरण । भानाइसा ॥ ७७
महादाई अनाई । येल्हन अशेश
देमाम्बे चे शिष्य । वंदीयेली ॥ ७८
देमाम्बे शिष्य । सारंग योगिया
जन्म देवराया । जेणें दीधलें ॥ ७९

देमाम्बे शिष्य । वंदीला महेशु
जेणे श्रीपरेशु । जोडीयेला ।। ८०
देमाम्बे शिष्य । अनंतासी वादना
नाव केले प्रादा । बानुनिया ? ।। ८१
देमेराज शिष्य । भास्कर गणेशु
हरीराज येल्हनु । कोमेराज ।। ८२
जैतकरण भानु । दत्त रामचंद्र
जायाबा मुनिंद्र । नाना योगी ।। ८३
चाल्हनु उमाजी । महदम्बा योगिनी
मयंबा मुख्ये करुनी । वंदीयेली ।। ८४
देमेराज शिष्य । हरीहर जान
"लुमाई" योगिनी । ख्याति मंत ८५
तुकोबा कान्होबा । चौवदा पै भानु
तयाचा शिष्य कान्हू । जाना तुम्ही । ८६
देमेराज शिष्य । वंदीला येल्हन
परशास्त्र व्यूत्पन्न । तैसा नहीं ।। ८७
देमेराज शिष्य । कोमेराज चांग
तेणे परमार्ग । पुजीयेला ।। ८८
कोमेराजा शिष्य । रेओबाबा जाना
नागो बाबा नामना । भीमसेनु ।। ८९
जेमेराजा शिष्य । मुरारी भास्करु
जंगाई सुंदर । साळा बाई ।। ९०
बल्लाळा शिष्य । भीमसेन जान
दूसरा गाईन । रेमेराजु ।। ९१

देमेराजा शिष्य । नमीन सुर्जान
ज्याशी जैतकर्ण । नाम साजे ।। ९२

जैतराजा शिष्य । युक्त सर्व गुणी
ते पद्माई योगिनी । वंदीयेली ।। ९३

पद्माई शिष्य । सौजन्य सागरु
तो नमीला योगेश्वरु । कान्हें राजु ।। ९४

ग्येमेराज शिष्य । अनुज नामना
तयासी नमिन । बांबेराजा ।। ९५

बांबेराजा शिक्ष । आबाई, जानाई
गंगा, धानु बाई । सोंगेराजु ।। ९६

चाल्हन गंगाधरु । शिव कमळाकर
राज योगेश्वर । नमन तया ।। ९७

जानाई शिक्षिनी । आइका साजनी
देवाचा चरणी । चित्त तीचें ।। ९८

धनाई वरदे । शिष्य जनार्दन
जो बोले व्यूत्पन्न । परशास्त्रीं ।। ९९

गंगा मुखे बोध । जाला पै एका
तया कुळ दीपका । नरसिंहा ।। १००

चांगाई, हंसाई । मल्हाइ, हरीहरु
एतुकेया गुरु । गंगाइसे ।। १०१

समस्त भावंडे । पढवीले जेणें
त्या गंगांबे शिष्य । नृसिंह ।। १०२

भीष्माचार्या मुखें । बोध निर्वाळला
शास्त्रीं व्यूत्पन्न जाला । नरसिंहे ।। १०३

येमेराज शिष्य । कान्हेराज आणि
कृष्णराज सजनी । नमीयेला ।। १०४
निर्वाळला बोध । कान्हेंराज संगी
तो नमीयेला योगी । कृष्णराज ।। १०५
कृष्णराजा शिक्ष । आईका नागेंद्र योगी
दूसरा मुनिद्र । राजसु पै ।। १०६
राजसु सिक्षकु । योगी मुरारी
जेणें ऋद्धिपुरी । वासु केला ।। १०७

★ इति येकाव बास ★

सोमेराज वरदे । परशास्त्रीं प्रवीण
तो सालेराज वित्पन्न । नमीयेला ।। १०८
व्यूत्पत्ती व्यूत्पन्नता । आली बोलता
ते देखीयेला । साले राजा ।। १०९
आचार निपुन । विचार संपूर्ण
ईश्वरी चे गुण । साले राजा ।। ११०
सालेराजा चंद्र । शास्त्री सुधाकरु
जिज्ञासु चकोरु । पूर्ण धाले ।। १११
यथार्थ निरोपकु । नमीयेला हस्तकीं
नमन मस्तकीं । सालेराजा ।। ११२
तार्कीकां गजान्नन । आळीयेलें व्यूत्पन्न
सालेराजा सिक्षकजन । मल्लनाथ ।। ११३
सूश्रूषादि विद्धि । घडली ज्यासी
तो स्तवीला मानसी । मल्लनाथु ।। ११४
सांडौनि युक्ति त्रय । परशास्त्र बोले
तो साष्टंगी नमीला । मल्लनाथु ।। ११५

अवंचक बुद्धि । केले दास्य जेणें
        त्या माझे नमन  मल्लनाथा ॥ ११६
निंदकासी शिक्षा । लावीली समस्था
        नमन त्या महंता । मल्लनाथा ॥ ११७
भक्तिभावे जन्म । अर्चिलें ईश्वरी
        तो मल्लनाथ शौरी । नमीयेला ॥ ११८
मल्लेनाथ सिक्षु । धाराबा साजनी
        माझे तीये योगीनी । दण्डवत ॥ ११९
मल्लेनाथा मुखें । जया पै ज्ञान
        त्या माझें नमन । शिवराजा ॥ १२०
मल्लनाथा शांती । बानली जयासी
        नमन तयासी । शिवराजा ॥ १२१
परि वाढिन्नला । शीतळ छाया तरु
        तो मल्लनाथा शिक्ष । शिवेराजु ॥ १२२
मल्लेनाथा सिक्षिनी । सौजन्य आगळी
        ते बानंबा विल्होळी । वंदीयेली ॥ १२३
दास्य पूर्ण युक्त । वंदीयेला महंत
        तो नमीयेला संत । आपेराजु ॥ १२४
सालेराज शिक्ष । पेम उपाओ केला
        तो रामचंद्र लाभला । येच देही ॥ १२५
ईश्वर वियोगे । रिगाला कंदरी
        तो नेला पै श्रीहरी । निजभेटी ॥ १२६
खांडे काढोनिया । मोहावरी गेला
        तो रामचंद्र पावला । मोक्षपद ॥ १२७
ईश्वर वियोग । सेवी डोंगरु
        भेटला चक्रधरु । रामचंद्रा ॥ १२८



रामचंद्रा वंशी । मयंक वाढिन्नला
भूतळी मिरवला । संता माजी ।। १२९
रामचंद्र महंत । ज्ञान रत्न खानी
याचका धवधनी । लागे जेथे ।। १३०
शास्त्र शब्द सुटी । जैसी मयंकासी
न ये आणिकासी । निरोपिता ।। १३१
नाहीं दृष्टी जया । आणिकां चंद्र दोषीतो
रामचंद्र वंशी मयंकराज ।। १३२
प्रसाद सेवन । अखंड स्मरन
नया माझे नमन । मयंकराजा ।। १३३
मयंकराज शिक्ष । गुरु भाउ मज
तें गाइन सहज । कृष्ण भोज ।। १३४
कान्हेराज आणि । भानेंराज जाना
तो योगीया पूर्ण । गोंदेराजु ।। १३५
भायं वा दोघे बंधु । शिव पै मुकुंदु
जोडीयेली शुद्ध । जगस्वरे ।। १३६
जन्म क्षेपीयेले । खडतर आचारे
मा जै राजा कुमक । जानेराज ।। १३७
★ इति सालो बास ★
सोमेराजा विरक्ती । मयंका बानली
ती विश्राम माघली । संत जना ।। १३८
ध्यान सिद्धि बळ । जाणें आणिकांचे
मतोगत साचे । बामेराज ।। १३९
बानली ध्यान सिद्धि । सामजा शिष्या
विख्यात विरक्ता । मयंकासी ।। १४०

माबेराज शिष्या । हरीमलनाथ
मुकुद विख्याता । नमीयेले ।। १४१
शिवराज शिष्या । मुनि दत्तराजा
तया पै माझा । प्रणीपातु ।। १४२
अन्वय अक्षरें । मयंकासी आली
तें हृदय स्थिरावली । दत्तराजा ।। १४३
नमीयेला मिया । गंभीर व्यूतपन्न
तो दत्तराज शिष्य । कमळाकरु ।। १४४
वाईदेशकर । विचित्र मंडन
तो दत्तराज नंदन । कमळाकर ।। १४५
दत्तराजशिष्य कान्हेराज नमीला
जयाचा शिष्य जाला । नानेराज ।। १४६
शिवराज शिष्या । नमीलें नाथा
साष्टांगी महंता । नमीयेले ।। १४७
आहेतुक क्रिया । सर्वदा कर्ण
माबेराजा शिष्या । मल्लिनाथा ।। १४८
अभिमान गर्व । त्यजुनियां दूरी
परमेश्वरु अंतरी । स्थिरू केला ।। १४९
मल्लनाथ शिष्या । नमीन साष्टांगीं
पंडिताचार योगी । दामेराज ।। १५०
राजहंस बरी । मार्ग प्रतिष्ठा
वंदिले वरेष्ठा । दामेराजु ।। १५१

★ इति श्री मायंबास थोरले ★

सोमेराजा शिष्य । अनर्घ निपनले
साष्टांगी नमीले । गोपीनाथ ।। १५२

गोपीनाथा शिष्य । परशास्त्री प्रवीण
ता नागिंद्र मुनि जन । नमीयेलें ॥ १५३
एक नाम दोघा । ऊळखी भिन्न असे
मुनि दायस । आळवीजे ॥ १५४
मुनि नागराज । शिष्य भीमसेनु
अणीक सजनु । तैसा नाही ॥ १५५
भीमसेना शिष्य । सौजण्याची खानी
वंदिला सजनी । कान्हेराजा ॥ १५६
कान्हेराजा शिष्य । वैराग्य पुतळा
नमीन विल्हाळा । बानेराज ॥ १५७
शास्त्री नागेराजा । मुखें शास्त्र जाले
हृदय स्थिरावले ॥ बोपदेवा ॥ १५८
बोपदेवा शिष्य । भीष्मदेव वदु
जेणें शास्त्र सिंधु । शोधीयेला ॥ १५९
शोधीयेला शास्त्र । व्यूत्पत्ती व्यूत्पन्न
जाला पैं निपुन । भीष्माचार्य ॥ १६०
गोपीनाथ शिष्य । नमीयेले दोन्हीं
कृष्णराज आणि । नानेराज ॥ १६१
कृष्णराजा शिक्ष । वंदु दत्तराजा
तयाची शिषीन । आबाबाई ॥ १६२
सोमेंराजा शिष्य । नमीला बल्लाळ
जेणें पै कृपाळ । चिन्तीयेला १६३
बल्लाळा अक्षरें । बानले जयासी
नमन तयासी । पर्शूरामा ॥ १६४
पर्शूराम शिष्य । नमीयेली दोन्हीं
दत्तराज आणि । गोपीराज ॥ १६५

बल्लाळा शिष्य । जाणा शिवराज
तयाचा शिष्य । शारंगधरु ।। १६६
शारंगधरा शिष्य । दाउबा बल्लाळ
येही पैं कृपाळ । वष्य केला ।। १६७
सोमेराज शिष्य । धानांबा नमीली
जीये पैं बानली । बोध शक्ती ।। १६८
धानांबा वरदे । ईश्वरी रंगला
तो मिया वंदीला । रेमेराजु ।। १६९
रेमेंराजा शिष्य । कान्हेराज जाना
दूसरे गहन । रूपदेव ।। १७०
धानांबा योगिनी । मयंकु बोधीला
जयासी बानला । पूर्ण योग ।। १७१
वडनेर ठाव । पवित्र आईका
जेथ जाला मयंका । रहीवासु ।। १७२
मयंका शिष्या । भद्रा योगीनी
ज्ञाने शुध्द बोधनी । धानाबाई ।। १७३
मयंका सन्निधी । जया जाला बोध
योगीया गोविन्द । नमियेला ।। १७४
गोविंदराजा शिक्ष । महा ख्यातीमंत
मार्गी प्रीतीवंत । कृष्णराज ।। १७५
आलिंग वृत्ति सदा । जाली ध्यान सिद्धि
वंदीला मनबुद्धि । चाल्हेराजु ।। १७६
सोमेराजा शिष्य । गोमेराज योगी
तयासी साष्टांगी । प्रणिपातु ।। १७७
गोमेंराजा शिष्य । नमीन उदारू
लेखीकु सुंदर । मार्गी माजी ।। १७८

दामे रामु जयें । जाले पै श्रवण
योगीया निपुण । आबेराज ॥ १७९
आबेराजा शिष्य । दत्तराजु नमीला
ईश्वरी रंगला । रात्र दीसु ॥ १८०
सालेराजा वंशी । रामचंद्र शिष्य
तो मयंक अम्हासी । नमित्य जाला ॥ १८१
देमेराजा शिषीण । दे मांबा आईका
तिया निरोवीला मयंका । सन्निधानी ॥ १८२
तेणें शास्त्र गुण । सांगीतलें मज
तें आरीहंस बीज । ठसावले. ॥ १८३
तेणें ची प्रसादे । गुरुकुळ प्रसन्न
एसी मज खून । प्रत्या आली ॥ १८४
तेणेची प्रसादे । पुर्वज वर्णीले
केले पैं गहण । वृद्धाचार ॥ १८५
वाईदेशकर । माझे पुरवज
ते मज दीना केवी । वर्णवेती ॥ १८६
नमन पैं माझे । समस्था आचार्या
परमार्गाचेया । बोधवंता ॥ १८७
अनुकूल बुद्धि । परमार्गी जया
सर्वस्वेसी तया । नमन माझे ॥ १८८
ब्रह्महत्या गेली । जन्मेजयाची
कथा पूर्वजा ची । आइकील्यां ॥ १८९
तसे प्रायश्चित । पातका माझेया
म्हण पै कृष्णया । कवि डिंभु ॥ १९०

इतिश्री विराटदेशोपनामाऽलंकृत कृष्णमुनि कविडिंभकृत स्ववृद्धाचार प्रबंध

॥ समाप्त ॥

पोथी पाठ समुदाये वाईदेशकर पाने २८५ ओळी ३१ अक्षर २४, पोथीचा आकार लांबी ६ इंच, ४ इंच रुंदी. दोनसे पानावर पाठ समुदाय पुढे ११ पानावर "ह्रा प्रबन्ध" पुढें लापिकादि समग्री.

---

## साहित्यिकांचे अभिप्राय १

श्री. कृष्णदास महानुभाव "आत्मतीर्थ प्रकाश" व "स्ववृद्धाचार प्रबंध' हे दोन छोटे ग्रंथ प्रसिद्ध करीत आहेत त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. हे दोन्हीं ग्रंथ विराटदेशे मुनि कृष्णदास कवि डिंभ यांचे आहेत. महानुभावांनीं मराठी ग्रंथरचनेत फार महत्वाचें स्थान मिळविले आहे. मुनि कृष्णदास विराट देशेचा ग्रंथसभारहि मोठा असून त्याचा दर्जाहि फार वरचा आहे. श्री दत्तात्रयाच्या चरित्रांतील एक कथाभाग आत्मतीर्थ प्रकाशात आला आहे, श्री दत्त सांप्रदाय महाराष्ट्रांत व कर्नाटकांत विशेष दिसून येतो. महानुभावांच्या पंच कृष्णामध्यें श्री दत्तात्रेयाचा समा-समावेश असल्यानें दत्तात्रेयविषयक वाङ्मय त्यांच्यांत होणे सहाजिकच आहे. आत्मतीर्थ प्रकाश ओवी वृत्तांत असल्याने व कवि डिंभ तो आत्मि-यतेनें लिहीत असल्यानें फार वाचनीय झाला आहे. स्ववृद्धाचारा मध्यें कवि डिंभ आपल्या परंपरेची माहिती देत आहे ती महानुभावांच्या ऐतिहासिक सामुतग्रीं भर घालणारी आहे. अशा माहितीच्या अभावीं पुष्कळवेळा गुरुपरंपरांच्या बाबतींत वाद निर्माण होतात ते होत नाहींत हा एक मोठा फायदा आहे. श्री कृष्णदास महानुभावांनी ग्रंथास माहितीपूर्ण व उपयुक्त प्रस्तावना लिहिली आहे. त्यामुळें ग्रंथ रोचक झाले आहेत. आर्थिक दृष्टीनें फायद्याचें नसतांनाहि ते असे ग्रंथ प्रसिद्ध करून पंथाची व मराठी भाषेची अशी द्विविध सेवा करीत आहेत. हें त्यांस भूषणावह आहे. त्यांच्या आध्यात्मिक साहित्य प्रकाशनाची ही दोन प्रकाशने आहेत त्यांत अशीच उत्तम भर पडत जावो ही इच्छा.

– ना. ब. जोशी

एक वयोवृध्द साहित्यिक, विजापूर

२

हैदराबादच्या आध्यात्मिक ग्रंथ प्रकाशन या संस्थेकडून आदरणीय श्री श्री कृष्णदास महानुभाव "आत्मतीर्थ प्रकाश" आणि "स्ववृध्दाचार प्रबंध" असे दोन दिसण्यांत लहान पण भाषा सौष्टव, लालित्य, प्रतिभा आणि अध्यात्मिक सम्पदादि गुणांनी सम्पन्न असे मराठी ग्रंथ प्रकाशित करीत आहेत. महानुभाव साम्प्रदायांच्या महापुरुषांनी प्रायः आपलें सारें धार्मिक आणि आध्यात्मिक ज्ञान भाण्डार मराठी भाषेत लिहून तिच्या आरंभीची काळांत तिची फार मोठी सेवा केली आहे आणि साहित्यालंकाराचे लेणें चढवून तिला ठाक ठीक आणि नागररूप दिले आहे, हें त्या सांप्रदायाचे ऋण मराठी भाषिकांना तरी विसरतां येणार नाहीं.

आत्मतीर्थ प्रकाश या ग्रंथाचा आणि माझा परिचय योगायोगानेच घडून आला म्हटले तरी चालेल. हा ग्रंथ आमचेच मुद्रणालयांत मुद्रणार्थ आला आणि त्याची प्रुफें तपासण्याच्या निमित्ताने माझ्या वाचण्यात आला. मूळ लेखक कृष्णदास कवि भिड हे प्रारम्भिक मराठी वाङ्मयांतले ख्यातनाम लेखक आहेत. भाषा, विषयवर्णन, वर्ण्य विषयाचे प्रगाढ ज्ञान आणि त्यामुळें उत्पन्न झालेला आत्मविश्वास आदि कवीच्या गुणसंपदेने मी तर चकितच झालो. इतिहास संशोधकांना मराठवाड्यांतील राक्षसभुवनादि गावांच्या नांवांच्या "आत्मतीर्थ प्रकाश' ग्रंथातील मूळकथा ज्याप्रमाणें उद्बोधक ठरतील त्याचप्रमाणें महानुभाव पंथाबाहेरील अध्यात्मिक साधनेच्या उपासकांनाही हा ग्रंथ उपयुक्त ठरेल यांत शंकानाहीं. श्री दत्त उपासना हा तर या ग्रंथाचा गाभाच म्हणता येईल.

सारांश हे छोटेसे ग्रथ प्रकाशित करून प्रकाशकांनी मराठी भाषेची फार मोठी सेवा केली आहे असेच मी म्हणेन. पण आजकाल कांग्रेसराज्याच्या तथाकथित सांस्कृतिक भ्रष्टाचारामुळे केवळ मराठीच काय परन्तु सर्वच देशीभाषी वाचकांच्या रुचीत पालट झाला असल्यानें प्रकाशकांचे हें प्रकाशन व्यावहारिक दृष्ट्या एक धाडस न ठरो एवढीच ईशचरणीं प्रार्थना.

— य. दि. जोशी

संपादक : 'हिंदु विजय' साप्ताहिक, हैदराबाद

३

अर्लीकडील सर्वसामान्य वाचकांची अभिरुची लक्षांत घेता गंभीर अध्यात्मिक साहित्याचे प्रकाशन एक अव्यवहारी ध्येयवादी धाडसच ठरावे. अशावेळी ' अध्यात्मिक ग्रंथ प्रकाशन हैदराबाद ' या संस्थेच्या वतीनें विराटदेशीय महाकवी मुनि कृष्णदास डिंभकृत ' आत्मतीर्थ प्रकाश ' आणि ' स्ववृद्धाचार प्रबंध ' हे ग्रंथ प्रसिद्ध होत आहेत त्याबद्दल धन्यवाद द्यावेत तितके थोडेच ठरतील.

हा ' आत्मतीर्थ प्रकाश ' ग्रंथ महानुभावीय कवीनें परमार्थ दृष्टीनें लिहिला असला तरी इतरांना आवडेल असा कथापर लालित्यपूर्ण आणि रोचक आहे.

कवीच्या शब्दांत :-

" कव्हणी ग्रंथी साहित्यालंकारु असे ।
परि पाता सिध्दान्तु न गवसे ॥
येरी ठायी सिध्दान्तु असे ।
तरी नसेचि साहित्यालंकारु ॥
तैसा न हो आत्मतीर्थ-प्रकाशु
जेथे दिसे साहित्य सिध्दान्तरसु ॥




असे या ग्रंथाचे यथार्थ वर्णन करता येईल. १२ अध्यायात विभागल्या गेलेल्या या आख्यानातील निवेदन ओघपूर्ण, रचना रेखीव, सर्वत्र शांतरस प्राधान्यानें असला तरी वीरादि रस ही अनुषंगाने आहेत. अन्तर्यामी झुळझुळणाऱ्या अध्यात्माच्या ओघामुळें प्रस्तुत ग्रंथ नांवाप्रमाणेच ' आत्मतीर्थ प्रकाश' झाला आहे. पंथीयांना हा ग्रंथ श्रध्देय तर वाटेलच इतरांनासुध्दा हृद्य वाटेल यात वाद नाहीं.

महाकवी मुनी कृष्णदास यांच्या नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञेचा हा लहानसा पण समग्र गुणांची कल्पना देणारा आविष्कार आहे.

या ग्रंथाबरोबरच प्रकाशित होणारा दुसरा ग्रंथ ' स्ववृद्धाचार प्रबंध' हा होय. या वैशिष्ठ्यपूर्ण ग्रंथामुळें कवीच्या गुरुपरंपरेची साद्यन्त साधार माहिती मिळून कवी आणि त्याचे काव्य याबर काल व परंपरादृष्ट्या बराच प्रकाशझोत पडूं शकेल.

श्री महंत कृष्णदास महानुभाव यांनी प्रयत्नपूर्वक प्रस्तुत ग्रंथाचें संपादन केलें. त्यांनी महितीपूर्ण परिचायक प्रस्तावनाही लिहिली. त्यांचे हे प्रयत्न परमार्गीयांनाच नव्हे तर सर्व मराठी भाषिकांना सदाचे ऋणी करून ठेवीत आहेत.

श्री महंत कृष्णदास महानुभाव यांची परमार्गावरील अविचल श्रद्धा. प्रदीर्घ उद्यमशीलता आणि कार्याविषयींची उत्कृष्ट तळमळ त्यामुळे हे प्रकाशन चढत्या वाढत्या प्रमाणात होईल आणि मराठी जनता त्याचा यथायोग्य पुरस्कार करील हा विश्वास आहे.

प्रा. भा. शं. कहाळेकर
मराठी विभाग
उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद

---

श्री कृपा मुद्रणालय, गोळीगुडा, हैदराबाद-द.

# आध्यामिक साहित्य प्रकाशन : प्रकाशित ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| १. | + श्रीमद्भगवद्गीता : हिंदी-दोहा चौपाई | १.०० |
| २. | + स्तोत्रसमुच्चय : सं. श्री. कृष्णदास महानुभाव | धर्मार्थ |
| ३. | महानुभाव-पंथ : ले. महंत श्री. बाळकृष्ण शास्त्री | ३.५० |
| | महानुभाव-पंथ : हिंदी-भाषांतर श्री. बालमुकुंद 'प्रभाकर' | ४.०० |
| ४. | + श्रीचक्रधर व महानुभाव : ले. श्री. गं. म. ठवरे | १.०० |
| ५. | + स्तोत्र-संग्रह : सं. श्री. कृष्णदास महानुभाव | ०.३७ |
| ६. | + मूर्तिवर्णनें, आरत्या, स्तवनें भजनें आणि स्तोत्र संग्रह : स. श्री. कृष्णदास महानुभाव | २.५० |
| ७. | + आरति-संग्रह : हिंदी सं. श्री. कृष्णदास महानुभाव | ०.५० |
| ८. | एकमुखी दत्तात्रेय : ले. महन्त श्री बाळकृष्ण शास्त्री | ०.३१ |
| ९. | + भारतीय दर्शन शास्त्र में धर्म की धारणा : ले. श्री. वसंत पवार एम. ए. | १.२५ |
| १०. | + सुबोधामृत : श्री. नारायणराव दादासाहेब तडस | ० १२ |
| ११. | + गीताप्रणीत व्यवहार शास्त्र : हिंदी श्री. वा.गो. मंडपे | ५.५० |
| १२ | + काळसमुद्रांतील रत्ने : ले. बॅरिस्टर गो. वि. देशमुख | ३.०० |
| १३. | महानुभाव दैनिक उपासना : ले. श्री. व. स. तोंडोळीकर | ०.७५ |
| १४. | + अनन्य भक्ति : ले. श्री. बाळकृष्ण शास्त्री | ०.५० |
| | अनन्य भक्ति : हिंदी-भाषांतरकार श्री. बालमुकुंद 'प्रभाकर' | धर्मार्थ |
| १५. | ज्ञान-प्रबोध : हिंदी-ले. महंत श्री. गोविंदराज द. महानुभाव | ४.०० |
| १६-१७. | आत्मतीर्थ-प्रकाश : आणि स्ववृद्धाचारप्रबध : सं. श्री. कृष्णदास महानुभाव | १.२५ |
| १८. | रुक्मिणी-स्वयंवर (संक्षिप्त प्रस्तावना व शब्दकोशासह) | ४.५० |
| १९. | रुक्मिनी-सैंवर : (प्रस्तावना पाठभेद व शब्दकोशासह) | ७.०० |

दोन्ही, सं. श्री. ना. ब. जोशी

प्रकाशक : श्री. कृष्णदास महानुभाव

श्रीगीता-आश्रम : तिलकरोड, हैदराबाद—१ (आंध्र प्रदेश)

---

+ या चिन्हांकित ग्रंथ सध्या उपलब्ध नाहीत. मागणी करूं नये.